


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका




साहित्य - कला - संस्कृति



जानेवारी १९६४
वर्ष १९ वें

## श्रेयनामावली—

**कथा :**

- **स्फोट**—जयवन्त दळवी • **सिनिक् कथा**—सिनिक् • **झिंग**—विजय हरि वाडेकर
- **ध्रुव ढळला**—श्रीकृष्ण ठाकूर • **ठाण**—मी. गो. जांभळे

**एक व्यंगकृति :**

- **चित्रपत्रें**—एका व्यंगचित्रकाराचें स्वप्नरंजित पत्र रेखाटन

**चालू कादंबरी :**

- **भीष्माचा डोंगर**—श्रीराम कामत लिखित कादंबरीचा पुढील भाग.

**ललित व विनोदी लेख :**

- **गुराख्याचा पोर-गॅरी कूपर**—के. टी. देशमुख • **अंतरिचा भाव एक**—रसिक मनोहर.

**आकर्षक सदरें :**

- **पेर्सो अक्षरें रसिकें मेळवीन**—गोपालन्, मधुकर कोसारे, केशव मेश्राम
- **दीपमाला**—सारस्वत • **गीतार-हास्य**—अजवराव • **पानपुरी** • याशिवाय हास्यचित्रें. पानपूरकें, व्यंगचित्रें, विगचित्रें इत्यादि.

दलाल आर्ट स्टुडिओ . ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

टे. नं. ७७७६५

Gram : DALALART

※ संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोस्ट ५५ न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींही अविकृत मतें असतातच असें नाहीं.


अनुक्रमणिका




दीपावळी

**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४,

टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढल जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

# नीचो वदति न कुरुते....

**पूर्वी** डिडिरवनांत दीनवच या नांवाचा एक चातक रहात होता. ईश्वराच्या या न्यायी सृष्टींत त्याच्याहि वांटयाला सुखदुःखाची उचित विभागणी आली होती. रोज रात्रीं अश्वत्थ पर्णाच्या आड त्याच्याशीं कांतेचा वियोग होई. रोज सकाळी सूर्योदयाबरोबर हा वियोग संपून त्याचें पुनर्मीलनहि होत असे. स्वातीच्या मेघाचा एक बिंदू अचूक त्याच्या चोंचींत पडे आणि त्याची वर्षाची तहान भागे.

हीच चातकाची युगायुगाची नैसर्गिक जीवनरीती होती. कांहीं असो पण चातक या जीवनरीतीमध्यें तृप्त आणि सुखीहि होता. आपणास कांहीं कमी आहे याची कांहीं जाणीव त्याला नव्हती. आलें वर्ष, आला दिवस असाच जावा हींच जणू जग रहाटी होती.

अशाप्रकारें चातकाचे दिवस चाललें असता एकेदिवशीं एक आगळी गोष्ट घडली. एक गरूड पक्षीण आपल्या पिलांना उड्डाण कला शिकवीत शिकवीत डिडर वनावरून गेली. तिच्या पंखाचें वारें त्या चातकाला चाटून जातांच त्याला स्वर्गीय दृष्टी आल्यासारखें झालें. त्याला कसल्या तरी असमाधानाची जाणीव होऊन ती प्रति दिन त्याचें जीवन कुरतडूं लागली. असलेली परिस्थिती त्याला जांचक होऊं लागली पण तिच्या बाहेर पडण्याचा मार्ग कांहीं त्याला सुचेना. चिंतामग्न स्थितींत तो असाच एकदा बसला असतां त्याची नजर सहज आकाशाकडें गेलीं. तों त्याच्या लक्षांत आलें की एक पांढरा शुभ्र ढग त्याच्याकडें निरखून पहात आहे. हा ढग मोठा नयनमनोहर होता. सामान्य ढग काळेकुट्ट वेडे विद्रे असतात. हा ढग तसा नव्हता. दिसावयास तर तो प्रसन्नवदन होताच. शिवाय त्याचा चेहरा इतका पारदर्शी होता की त्याच्या अंतःकरणावर जणूं कोणताच पडदा नसावा. त्याच्या चेहऱ्यावरचें शुचिर्भूत हास्य त्याच्या अंतरांतून स्फुरत असावें असें दिसत होतें. त्यानें शुभ्र टोपी डोक्यावर परिधान केली होती. शुभ्र धोतर, शुभ्र अंगवस्त्र त्याला आगळें पावित्र्य देत होतें. त्याच्याकडे पहाताच दीनवचाला वाटले कीं जगाचें राज्य चालविणाऱ्या प्रभूचा हा एकादा कल्याणकर मंत्रीच आपल्या भेटीस आला आहे.

दीनवचाची आणि शारद नांवाच्या त्या ढगाची नजरानजर होतांच शारद दीनवचाला म्हणाला, "काय रे, राज्याची व्यवस्था ठीक चालूं आहे ना ?"

त्यावर दीनवच म्हणाला, "काय सांगू महाराज ?"

त्यावर शारद त्याला धीर देत म्हणाला, "सांग सांग. मी प्रभूच्या आज्ञेने तुझें दुःख निवारण करण्यासाठींच दौरा काढला आहे. मी मोठा समर्थ मनुष्य आहे. मी स्वर्गातील तारे भूमीवर आणूं शकतों. मी अमावास्येला चंद्रोदय घडवूं शकतों. मी सारा सागर पिवूं शकतों. मी तुला मोत्याचा चारा देऊं शकतों. सोन्याचें घरटे देऊ शकतों. मला अशक्य काय आहे ? अरे मी मंत्री आहे. काय समजलास?"

शारद हा प्रभूचा मंत्री असावा अशी शंका दीनवचाला आली होतीच. त्याची खात्री पटतांच दीनवच आनंदला. आपल्या जन्माची ददांत सुटली असें त्याला वाटलें. दाराशी जणूं कामधेनूच आली. हा क्षण हातचा जाऊं नये अशा निर्धारानें त्यानें आपलीं सारीं गाऱ्हाणीं शारदाच्या कानावर घातली. आपणास रात्रीं कांतासंग घडावा, आपणांस रोजच एक थेंब पाणी पिण्यास मिळावें अशी तीं गाऱ्हाणीं होतीं.

तीं गाऱ्हाणीं ऐकून शारद हंसला आणि म्हणाला, 'बस्स् ? ही तर साधी गोष्ट आहे. आज रात्रींच तूं कांतेचा भोग घेशील, उद्यांच तुला प्यावयास पाणी मिळेल."

असें आश्वासन देऊन आणि एक गुळगुळींत नमस्कार करून शारद दौऱ्यावर पुढें निघून गेला. आपलीं दुःखें संपलींच अशा उत्कंठेनें दीनवचानें कसाबसा दिवस



अनुक्रमणिका









### चोखंदळ वाचकाचा नमूना

स. न. वि. वि.

**मी** आपल्या मासिकाचा प्रत्यक्ष वर्गणीदार नसलो तरी एक वाचक आहे. 'दीपावली' मासिक अत्यंत लोकप्रिय असल्यामुळें जरी दर महिन्याचें अंक वाचनालयांतून वाचावयास मिळत असलें तरी दिवाळी विशेषांक कधीच वाटचास येत नाहीं. यासाठीं मी दीपावलीचा दिवाळी विशेषांक विकत घेत असतो. अंकासोबत आपल्या चित्रांचेहि आकर्षण असतेच. प्रत्येक चित्र संग्राह्य असतें.

यावेळचा अंक मी काळजीपूर्वक वाचला आहे. तो सर्वांगसुंदर आहे. 'तपस्विनी गंगा' आणि 'सरस्वती' ही दोन चित्रें विशेष आवडली. पु. ल. देशपांडे यांच्या विनोदी आणि दिर्घ लेखांत मन चांगलेंच रमते. अरविंद गोखल्यांची 'शपथ' आणि डॉ. कु. दमयंती सरपटवारांची 'अश्वमुद्रा' दीर्घकाल स्मरणांत राहील. याशिवाय जयंत दळवी, वसंत सबनीस, शामराव ओक, बाळ सामंत यांचे विनोदी लेख अतिशय आवडले. कवितेची कमतरता मला जाणवते.

आपल्या अंकांतील साहित्याची ठराविक अशी चाकोरी नाही. कारण कांहीं मासिकें एखाद्या विषयाला वाहिलेली असतात. (उदा- शृंगार) त्यामुळें त्यांचा एक वेगळाच वाचक–वर्ग असतो. परंतु आपल्या मासिकांतील साहित्याची मांडणी सर्व थरांतील लोकांना आवडेल – त्यांचे समाधान होईल अशीच असतें. साहित्यांतील सर्व रसाचा आपल्या मासिकांत सुंदर संगम झालेला असतो आणि आपले मासिक अत्यंत लोकप्रिय ठरण्याचें गमक यांतच आहे, असें अनेक वर्षे आपलें मासिक वाचून माझें मत झालें आहे.

याशिवाय चालू वर्षी आपण रंगीत व्यंग-चित्रमालिका सादर करण्याचा जो नवीन उपक्रम केलात तो अत्यंत अभिनव आहे. भारतीय सणावर काढलेली व्यंगचित्रें तर अति–उत्कृष्ट आहेत. त्यांतील कल्पकतेचे कौतुक करावें तितुके थोडेच होईल. 'लेखकांच्या नाना कळा,' 'रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग' 'नद्यां वरील भाष्य' इ. साहित्यहि आवडले.

आमच्या घरांतील सर्वांना 'बुद्धिबळ' हे सदर फारच आवडलें. सप्टेंबरच्या अंकापासून हा उपक्रम सुरु झालेला आहे. तो अत्यंत लोकप्रिय ठरेल यांत शंकाच नाहीं. बुद्धिबळामुळें – ते सोडविल्यामुळें बुद्धिला एकप्रकारची चालना मिळते.

शेवटी आपले मासिक दिवसेंदिवस लोकप्रियतेच्या शिखरावर चढो, हीच इच्छा.

एक वाचक
**विजय एकनाथ जाधव**
सर्जेपुरा, अहमदनगर,

### साहित्य व कला यांचा संगम

स. न. वि. वि,

दीपावली मासिकाची मी एक नियमीत वाचिका आहे. आपल्या मासिकांत खरोखर साहित्य, कला व संस्कृति यांचा खऱ्या अर्थाने संगम झालेला आढळतो. दीपावलींतील साहित्य, चित्रें, योजना व सजावट बहुरंगी व डोळ्यांना मोह पाडणारी असते, त्यामुळें अंकाचे पाननपान वाचावेसें वाटतें.

दीपावलीचा डिसेंबर अंकहि जरा नेहमीपेक्षा चित्रांनी जास्तच सजविल्या मुळें एकदम नजरेंत भरतो. आपल्या अंकांतील प्रत्येक अंकांत येणाऱ्या साहित्याच्या परिचयात्मक ओळी मात्र लक्षवेधून घेतात व साहित्य वाचावयास भाग पाडतात. कधीकधीं तर त्या ओळी कथासाहित्यांत नसतातहि. तरी पण कथेचा संक्षिप्त परिचय सुंदर असतो.

असेच सदोदित आकर्षक साहित्य दीपावलींतून वाचावयास मिळो ही अपेक्षा.

आपली,
एक वाचिका
**सौ. ललित व. कांबळे**
खार, मुंबई ५२

---

काढिला. अंधार पडतांच त्यानें कांतेला खाजविण्यासाठीं चोंच पुढें केली. तो. . . .

त्याच्या समोर त्यांची कांता नसून झाडाचें पान उभें होतें. आणि त्याची फजिती पहाणारें एक चावट घुवड आपली गाथा म्हणत होतें,

शरदि न वर्षति गर्जति वर्षति वर्षासु निस्वनो मेघः
नीचो वदति न कुरुते न वदति सुजनः करोति एव ।।

—उषाकान्त

---

क्रिकेट पुरवणी

## महत्त्वाची दुरुस्ती

**दीपावली जानेवारी ६४ चा अंक 'क्रिकेट पुरवणी' म्हणून काढण्यांत येईल अशी घोषणा गेल्या अंकांत आम्ही केली होती. परंतु जानेवारीमध्यें भारत वि. इंग्लंड यांच्यांत होणाऱ्या क्रिकेट टेस्ट मॅचच्या कार्यक्रमांत किंचित बदल करण्यांत आल्यानें दीपावलीच्या क्रिकेट पुरवणी मध्येंहि आम्ही किंचित बदल करीत आहोत.**

**आतां हीच 'क्रिकेट पुरवणी' दीपावलीच्या फेब्रुवारी अंकांत देण्यांत येईल. फेब्रुवारी ६४ चा अंक 'प्रजासत्ताक-दिन विशेषांक व क्रिकेट ुरवणी' अशा विविध स्वरूपांत प्रसिद्ध करीत आहोंत याची वाचकांनी कृपया नोंद घ्यावी.**

**— संपादक**










# अग्निमाता डोंगर

— श्रीराम कामत

## पूर्व कथासूत्र....

**नव्या कंपनीचं उद्‌घाटन झालं होतं. 'कामालाहि सुरवांत झाली. विजय कामगारांची भरती करण्यांत गुंतला होता. गांवांतली सर्व तरुण पोर कंपनींत भरती व्हायला आली होती. विजय त्यांची निवड करीत होता. मध्येच त्याला लहर आली कीं तो त्यांची टिंगलहि करी.**

**या चार महिन्यांत गांवाचं रुपच पालटलं होतं. उद्योगाला नव्यानें सुरवांत झाली होती. विजयला फुरसत नव्हती.....त्यादिवशीं तो असाच सवड काढून समुद्रकिनाऱ्यावर फिरायला गेला. अल्लडपणा त्याच्या अंगांत शिरल्यासारखा तो खडकावर चढला. तो काय....वासंती समोरच उभी होती. दोघे मोकळेंपणें बोलली व परत फिरली.**

**इकडे अण्णा आपल्या कामांत व्यस्त होते. ग्रामपंचायतीच्या निवडणूका जवळ आल्या होत्या. गांवांत एकच धांदल उडाली होती.....**

**आतां पुढे वाचा....**

**१५** **घोटाळा** करण्याची संधि आली आणि दाजी नावरानं ती गमावली असं कधीं झालंच नाहीं. खरं म्हणजे राजिनामा द्यायचं त्याला कारण नव्हतं.

कुठचा कोण हा अण्णागुरुजी ? अरे, त्याची जात काय, लायकी-काय, अक्कल कसली ?— दुसरा नाहीं, निदान एव्हढातरी विचार दाजीनं करावयाला हवा होता. मुळांत अक्कर माशी जात ही ! आगा नाही पिछा, ढोरगीं कुत्रीं तीं. त्यांना फक्त भुंकायचं ठाऊक ! तिकडे दुर्लक्ष करणं शहाणपणाचं कीं नाहीं ?

दाजीच्या राजिनाम्याचं प्रकरण कानावर आलं तसं टाळूवरून हात फिरवीत हुंकारत भाऊ कुळकर्ण्यानं मत दिलं.

पंचायतीच्या मिटिंगला सकाळीं व्हायला नको तो प्रकार झाला होता. वामणांविरुद्ध अण्णागुरुजी बोलायला नको तें बोलला. नसतं येळकूट चालवलं थेरड्याचं आणि तो एक एक मलतंच बरळत सुटला. आतां या वेडपटाच्या तोंडाला लागण्यांत कांहीं अर्थ होता का ? पण दाजी नावराला तें धोरण नव्हतं. तो गेला शिकवायला आणि केलंन् आपुलंच हंसूं, फुकट चारचौघांत. बरोबर आपल्या जातीचंदेखील. दाजीचं ब्रह्मज्ञान कोणाला कळणं शक्यच नव्हतं. अण्णागुरुजींचं बोलणं निदान सोपं होतं, स्पष्ट होतं. अडाण्यालाहि तें कळण्यासारखं होतं. तशांत पहिल्यासारखी बामणांबद्दल लोकांच्या मनांत आज भावना उरली नव्हती. चाकरीनिमित्त बाहेरगांवीं रहाणाऱ्या पोरांनी ती आधींच कलुषित केली होती. बामणांकडे लोकं जरा संशयानं बघत. त्यांची सुखस्थिति बघून यांना आपल्यावर अन्याय झाल्याची जाणीव होई. आणि त्याच तिडिकेनं तीं आंतल्याआंत धगत रहात, डूख बाळगून वावरत.

खरं होतं. आणि म्हणूनच पंचायतीपुढं उभा राहून अण्णा-गुरुजीनं बामणांच्या नांवानं इतका शंख केला तरी एकानंदेखील हरकत घेतली नाहीं. म्हटलं नाहीं कीं 'अण्णा, फाजील बोलणार असलास तर बाहेर हो ! पंचायतींत दोघेतर बामणच होते. गुणाजी नाडकर्णी आणि दाजी नावर. गुणाजी धूर्त. ह्या भानगडींत तोंड घालणं त्याला बरोबर वाटलं नाहीं. ह्या देवळ्याला परस्पर इतरांनी जाब द्यावा आणि ते तो तसा देतीलच अशी नाडकर्ण्याला खात्री होती. पण नाहीं, बाकीच्यांना ते सुचलंच नाहीं. ते आपले टकमक अण्णाच्या तोंडाकडे बघत राहिले. बऱ्याच आश्चर्यानं, किंचित कौतुकानं. म्हणजे तसाच प्रकार होता. प्रत्यक्ष दाजी नाव-राच्या तोंडावर हा म्हातारा देवळी बामणांना श्राप देत होता. सांगत होता, "दाजी, अरे तुझ्यापेक्षांसुद्धां गांव मोठा आहे मला. गांवाच्या हिताचा प्रश्न आला कीं तुझ्यासारखें छप्पन दाजी मी आधीं मसणांत पोंचवीन आणि मग फुरसदीनं रडत बसेन. तर सांगायचा मुद्दा—गांवाचं हित तुझ्या हांतून होणार नाहीं. कारण तूं आहेस बामण. बामणानं दुसऱ्याचं कधीं भलं केलं आहे रे ? केलं फक्त वाटोळं, सत्यानाश. गांवांत आपलं वर्चस्व रहावं, सत्ता टिकावी म्हणून स्वताचं नाक कापून उभ्या गांवाला अपशकून करणारी हलकट जात तुमची. नाहीं दाजी, माझा कुठल्याच बामणावर विश्वास नाहीं. तुझ्यावर देखील."

हें असं तोंड सोडलं अण्णागुरुजींनं. आणि ग्रामपंचायतीचा तो मेंबरसुद्धां नव्हता. मनांत असतं तर ह्या मेंबरांनी त्याला हाताला धरून बाहेर खेचला असता. गुणाजी नाडकर्णी तर वाटच बघत होता. पण तसं घडलं नाहीं. कोणाच्या मनांतच आलं नाहीं. अण्णाच्या बोलण्याचा परिणाम झाला होता, जरूर झाला होता. अभ्रं भरून होतींच, मळभ धरून होतं. क्षितिजावर ठिणगी पडली. सर्पाची पिलं लखलखूं लागलीं.

आणि झालं! दाजीच्या अंगांत निराकार आलं. मेघगर्जना व्हावी तसा तो कडाडला, "देवळ्या, माफी माग. माझी—माझ्या जातीची—"



अनुक्रमणिका

"ह : हा : हा : !" अण्णागुरुजी हातवारे करीत खिदखिदला. आणि कुचेष्टेनं म्हणाला, "माफी ? आं ! तुझ्या जातीची सुद्धां ? तूं सांगणारच, सांगणारच तसं ! बामणच कीं नाहीं ? थू : तुझी !

पंचायतीचीं लोकं तरीहि आपलीं स्वस्थच ! आंवढे गिळीत, लाळ चघळीत. दोन म्हाताऱ्यांच्या या झगड्यांत मध्यें पडायला कोणी तयार होईना. पटत होतं कीं दाजीची बाजू बरोबर आहे. पण तसं म्हणावं तर अण्णागुरुजी चूक म्हणावं लागलं असतं. आणि तो तर त्यांच्या बाजूनं बोलत होता, त्यांच्या वतीनं झगडत होता. तेव्हां अण्णालाहि ठपका देणं हरामीचं झालं असतं.

"मंडळी, माझी आणि माझ्या जातीची ह्या अण्णानं पंचायतीपुढं निष्कारण बदनामी केली आहे. आणि पंचायतीनंहि शांतपणं ती ऐकून घेतली. उपकार ! या गोष्टीचा निषेध म्हणून पंचायतीचा आणि ग्राम विकास मंडळाच्या मेंबरशीपचा राजिनामा देणं माझं कर्तव्य आहे असं मी समजतो." दाजी नावरानं तडकाफडकीं सांगून टाकलं.

गळ्याचा मफलर गुंडाळत तो उभा राहिला. डोळ्यांचा चष्मा काढून त्यानं खिशांत ठेवला.

आतां कुठं पंचायतीचीं मेंबरं भानावर आलीं. यावंच लागलं म्हणजे गोष्टी इतक्या थराला जातील अशी कोणाला कल्पना नव्हती. राजीनामा—दाजी नावराचा राजीनामा ? मलतंच कांहीं ! मग संपलंच म्हणायचं ! पंचायतीची अब्रू उघडी, अगदीं उघड्यावर पडणार होती. आणि नाहीं म्हटलं तरी ही गोष्ट महत्वाची होती.

"छा : छा : ! बरोबर नाहीं दाजी—"चारपांच घोगरे आवाज घरघरत उठले, "बरोबर नाहीं. आणि खरंसुद्धां."

सरपंच बाळ्या सुतार तर वैतागानं ओरडला, "तूंच नाहीस म्हणजे बरखास्त करून टाकतो पंचायत ! तिला तरी काय अर्थ उरला ? निदान हा एक विचार कर दाजी."

दाजीनं थंडपणं म्हटलं, "सगळा विचार केला. आणि पटलं कीं मी राजीनामा देणंच योग्य आहे."

तसें दोघेतिघें अण्णागुरुजीची विनवणी करूं लागले, "अण्णा, अरे माफी माग—बाबा माफी मागून टाक त्याची."

" माफी मागूं ? " अण्णागुरुजी उसळला नसता तरच आश्चर्य ! थर थर हात उडवीत तो ओरडला, "पाया पडतों, लोटांगणं घालतों. नालायक, मेकड—"

"अण्णा, अरे नाहीतर तो राजीनामा देणार—" सरपंच अगदीं हताश झाला होता. काकुळतीस आला होता.

"देई ना ? काय ? घ्या तो." अण्णागुरुजी मलताच अवसानांत होता. म्हातारा एकूण खुशींत होता. त्याचं काम झालं होतं. आजची पंचायत त्यानं गाजवली होती. दाजी नावराला सफशेल चित केला होता. त्याच उत्साहांत त्यानं सांगितलं, " अरे हा अण्णागुरुजी आहे. तुमचा माणूस. महामायेच्या कृपेनं ह्या बामणांना आपण नक्की आडवे घालूं. कसली काळजी करतां लेको तुम्ही ? आं ! . . . . ."

दुपारपर्यंत गांवांत बातमी झाली. दाजी नावरानं ग्रामपंचायतीचा राजीनामा दिला. बामणाची ही जागा अण्णागुरुजी लढवणार. येत्या रविवारला निवडणूक.

तसं, कांहीं कायदा नव्हता. पण कित्येक वर्षं वहिवाट पडून राहिली होती कीं ग्रामपंचायतींत बामणांचे दोन सभासद असावेत. त्यांची निवड केली जाई भाऊ कुळकर्ण्याच्या घरीं. त्यांचे तेच दोन नांवं सुचवीत. आणि मग प्रत्यक्ष निवडणुकीला त्यांच्याविरुद्ध इतर कोणी उभं राहात नसे. हे दोन्ही मेंबर बिनविरोध निवडून येत.

आजवरची ही वहिवाट मोडून अण्णागुरुजी ग्रामपंचायतींतील बामणांच्या जागेसाठीं दंड थोपटून खडा टाकला होता. मुद्दाम. गांवांतील बामण मंडळीला डिवचण्यासाठीं, चिथवण्यासाठीं.

अर्थात बामणांना तें आव्हानच होतं.

न सांगतां, न बोलतां एक एक बामण भाऊ कुळकर्ण्याच्या ओटीवर हजर झाला. अण्णागुरुजीच्या शब्दांत बामणांची 'ऑल् इंडिया कॉंग्रेस' भरली.

विषय—दाजी नावराचा राजीनामा आणि पुढं काय ? पुढं काय हाच खरा प्रश्न होता. राजीनामा देण्यांत दाजीनं घोडचूक



केली होती याबद्दल कोणाचंहि दुमत नव्हतं.

गुणाजी नाडकर्णी पक्का बेरकी. बोलतां बोलतां त्यानं खडा टाकला. सहज, पुढचा अंदाज घेण्यासाठीं. म्हटलं, "झालं तें बऱ्याच-करितां."

"अरे, हें गुणाजी बोलला बरं का ?" पिचका आवाज चढवून माऊ कुळकर्णी ओरडला," आपलं क्लीअर केलेलं बरं. गांवांत फुकट नांव व्हायचं आमचं. म्हणतील माऊ कुळकर्ण्याला आनंद झाला."

पण त्याचं हें सगळं वरवरचं बोलणं होतं. मनांतून माऊ खुप होता. त्याच्या मनासारखं झालं होतं. त्याच्या द्वारकानाथाची लाईन आतां मोकळी झाली होती.

वसंत बापलानं ही संधि घेतली. तो बोलला, "नाहीतरी माऊ, मी विचारतो, गुणाजीचं काय खोटं हो ?"

"खोटं नाही म्हटलं मी." माऊचा मतलबी खुलासा. "पण या गोष्टी माऊनं बोलतां कामा नयेत. अर्थाचा अनर्थ झालाच."

"आतांतरी डोळे उघडतील ह्या दाजीचे." बाळचा नावराचा आपल्या कनिष्ठ बंधूला आशिर्वाद मिळाला.

"कसचे उघडतात ! " गुणाजी हळहळला, " दाजीला डोळे नाहींतच. "

जाम हंशा पिकला. माऊ कुळकर्णी तर सोडावॉटरची बाटली फुटावी तसा फसफसला. ' हें हें ' करीत म्हणाला, "गुणाजी, तूं एक दिवस जीव घेणार आहेस माझा. ह्या अशा बोलण्यानं. मुंबईच्या त्या स्पेशालिस्टानं सांगितलं आहे—जोरानं हंसूं नका माऊ हार्ट फेल होईल. काय ? . . . "

वसंत बापला कळवळून बोलला, "मग नकाच हंसूं."

"ह्या—ह्या शहाण्याला अक्कल नाही ? कशाला कुचेष्टेचं बोलणं काढतो ?" बाळचा नावरानं गुणाजीलाच दोष दिला.

माऊ कुळकर्ण्याला हें हवंच होतं. लोकांची फुकट सहानुभूति मिळाली कीं मग त्याच्या जिवाला बरं वाटे. वाटे लोकांना आपली काळजी आहे, महत्व आहे. माऊ कुळकर्णी अजून त्यांना जिवंत रहावा असं वाटतं. आणि तसा मग त्याला हुरूप येई. बोलण्या-चालण्याला जोर येई.

उगाच नाही, छातीवर डावा हात ठेवून धांपा टाकीत माऊ म्हणाला, "कुचेष्टा नाहीं बाळचा. बरोबर बोलला गुणाजी. द्वारका-नाथानंदेखील रत्नागिरीहून आल्यावर अगदीं हेंच मत दिलं. म्हणाला दाजीला इनसायट नाही. म्हणजे काय ? तेंच !"

" आं ! दाजी नावर तर सांगत सुटला आहे, रत्नागिरीला आपण यंव् केलं आणि त्यंव् केलं" गुणाजी नाडकर्ण्यानं शंका काढली.

" खोटं ! बिलकुल बोगस !"

" दाजी कधीं खोटं नाहीं बोलणार. " बाळचानं मावाची बाजू घेतली.

" मग मी खोटा. म्हण कीं !" माऊ तडकला," माझा द्वारका-नाथ खोटा. मांचोद्, कोणी खरं सांगूं लागला तर म्हणतात खोटं. चांगला न्याय—उत्तम. "

"माऊ, बोला तुम्ही." कुणीतरी एकानं पर्याय काढला, "कशाला लक्ष देतां बाळचाकडे ?"

" हूं : ! खरं तुझं. नाहीं लक्ष देत. आजारी माणूस मी. छाती दुर्बळ. तर काय सांगत होतों ? होय, रत्नागिरीलासुद्धां दाजी नावरानं तमाशाच केला. सरकारला आणि सरकारी अधि-काऱ्यांना काय वाटेल तें बोलला. काय तर म्हणे, गांवच्या लोकांना न विचारतां कंपनी गांवांत आलीच कशी ? जबाबदार कोण ? सरकार, सरकारी अधिकारी कीं दोघेहि ? ह्या खाणी सुरू करण्या-करितां कंपनीनं संबंधित लोकांना पैसा चारला असला पाहिजे हें उघड आहे. या प्रकरणाची निःपक्षपाती चौकशी व्हायला पाहिजे. जिल्हा विकास मंडळाच्या बैठकींत दाजीनं जाहीर आरोळीच ठोकली. कलेक्टर म्हणजे काय माऊ कुळकर्णी वाटला याला ? यानं काय वाटेल तें बोलावं आणि आपलाच माणूस म्हणून आम्ही तें मुकाट ऐकून घ्यावं. अरे, जिल्ह्याचा बादशहा तो. दाजीला तो बोलला नाहींच. फक्त शिपायाला बोलला—या मॅडकॅला बाहेर काढ. ह : ह : ह : ..." माऊ कुळकर्णी एकदम खिकाळला.

" कोणाला ? दाजीला ?" बाकीच्यानी विचारलं. आणि तेसुद्धां हंसूं लागले.

" त्यालाच, अरे त्यालाच ! ऐकतां काय मग ?" थोडा दम खाऊन माऊनं सुरवांत केली. "तसा दाजी एकदम तडकला. हातवारे करीत ओरडला — मॅड कॅप नाहीं. गांवी कॅप. तुम्हा अधिकाऱ्यांना ती मॅड वाटली तर तो दोष माझा नाही—या दाजी नावराचा नाहीं. कलेक्टरनं त्याला मध्येंच विचारलं—आपण दाजी नावर ? तर आमच्या ह्या खुळानं काय जाव द्यावा ? ओळखा कीं ! म्हणाला—होय. आम्हीच. बेड्या घालणार असाल तर घाला. तुरुंगाची संवय आहे आम्हाला."

तालांत आला कीं माऊ कुळकर्णी एखादी गोष्ट भलतीच खुलवून सांगे. त्याला ही एक विलक्षण हातोटी होती. आवाजांत जरा उणा. नकला बाकी झॅक करी. आतांदेखील दाजी नावराची नक्कल त्यानं इतकी हुबेहूब केली कीं जमलेल्या मंडळीला हंसूं आवरेना.

" जेलची हवा एकदां खाऊन आलाच आहे. तेंव्हा दाखवतो ज्याला त्याला रुबाब." गुणाजी नाडकर्ण्यानं हंसून म्हटलं.

कारण नव्हतं. पण नाडकर्ण्याला विरोध केलाच पाहिजे या जाणीवेनं बाळचा नावर पिसाळलेला. तो बोलला," मांचोद् दरोडे घातले म्हणून नाही गेला दाजी जेलांत. पुढारी म्हणून गेला."

"आम्हाला बोलूं देणार ? का तुम्हीच आपसांत वाद घालीत बसणार ?" वर्गांत मास्तरानं पोरांना दम भरावा अशा थाटांत डोळे वटारून माऊनं त्या दोघांना दटावलं.

"तुम्हीच बोला माऊ." त्यांची विनशर्थ मंजुरी मिळाली.

वर कपाळावर घेतलेला चष्मा खालीं नाकावर ओढून म्हातारा माऊ सांगूं लागला, "म्हणजे जातच होता—अरे बाळचा, दाजी जेलांतच जात होता. पण मेहरबान डेप्युटी मिनिस्टर सावंतांचं कलेक्टराला पत्र आलेलं. दाजी नावराला नाराज करूं नये. मांचोद !






अनुक्रमणिका

काय हें ? ह : ह : . . . मोठा पोलिटिकल माणूस हा–हा कलेक्टर ! काय ? म्हणून तर थोबाड विचकत पुढं झाला. दाजीला हाताला धरून त्यानं जवळ बसवून घेतला. मोठ्या अग• त्यानं त्याचं म्हणणं ऐकून घेतलं. सगळंच्या सगळं, संपूर्ण दाजीगाथा. हाःहा : . . . तर दाजीची रेकार्ड सुरू झाली. हीं अशी. कंपनी बंद करा. माझं गांव मी नासूं देणार नाहीं. बारा गांवची घाण हियं गोळा करून सरकार गांवाचा उकीरडा करणार आहे कीं काय ? नाहीं–हें कधींहि होणार नाहीं. दाजी नावर होऊं देणार नाहीं. हां ! तर सारखं आपलं हेंच. आमचा द्वारकानाथ सांगतो ना ! कलेक्टरानं त्याची समजूत घालण्याचा खूप प्रयत्न केला. सरकारची पॉलिशी नीट समजावून सांगितली. देशांत इंडस्ट्रीज झाल्या पाहिजेत, लोकांना रोजगार मिळाला पाहिजे, राष्ट्राचं उत्पन्न वाढलं पाहिजे. एक नाही, अनेक गोष्टी सांगितल्या. त्या ऐकून घ्यायला दाजीला धीर नको ? तो मध्येंच ओरडला म्हणे– "अरे पण माणसांचं काय ? त्यांना काय कुदळीनं फावडीं बनवणार आहांत ? आणि ह्या गांवाचं कसं ? भारतीय संस्कृतीचं मंगल आणि सुंदर प्रतीक हें ! गटार करा त्याचं ! नाहींतर पायखाना . . . ."

"बोंबला ! म्हणजे मूळावच घाव–" इतरांनीं वैतागानं कपाळाला हात लावला.

"तर सांगतों काय ? बोंबललंच होतं सगळं–एकूण एक !" भाऊ कुळकर्ण्यांचा आवाज एव्हाना सप्तमांत गेला होता. मध्येंच फुटतो का काय इतका चढला होता, "कंपनी नाहीं, ती तर थेट दिल्ली-पर्यंत आडवी पडली आहे. पण गांवचा आवाज मात्र बंद झाला. असता. नुकसान झालं असतं गांवाचं मुख्य म्हणजे तुमचं. जमिनीला भाव येण्याची वाट बघत बसलां आहांत लेको ! हद्दी मारल्यांत, गडगे घातलेंत, कुंपणं केलींत. लोकांना नाहींच, पण गुरांनासुद्धां शिरूं देत नाहीं रे तुम्ही ! अरे पण ठाऊक आहे ? सरकार एक फर्मान काढील आणि तुमच्या जमिनी ताब्यांत घेऊंन शकेल. दोन्ही हातांनी मग फांक्या मारा ! पण वांचलांत, वांचलांत तुम्ही. माझ्या द्वारकानाथानं वाचवलं. एक त्या पोरानं तुम्हाला बुडूं दिलं नाहीं. जगवलं. तुमच्या जमिनी सरकारला कंपनीच्या ताब्यांत देऊं दिल्या नाहींत. कंपनीच्या कारभारांत गांवाला त्यानं शिरकाव मिळवून दिला. सरकारनं खाणसमिती नेमावी आणि ग्रामविकास मंडळाचा अध्यक्ष म्हणून दाजी नावराला तिचं सभासदत्व मिळावं असा ठराव माझ्या द्वारकानाथनं पास करून घेतला. अरे इतकंच काय, पण कंपनीला मिळणाऱ्या फायद्याचा चौथा हिसा गांवच्या विकासासाठीं खर्च झाला पाहिजे असा दुसरा ठरावसुद्धां मंजूर करायला लावला. अतां बोला–"

"अरे तुझाच मुलगा तो भाऊ–" बाळ्या नावर उत्साहाच्या भरांत एकदम पाघळला. आणि मागून सावध झाला. आपलं कुठं चुकलं तर नाहीं ना ? तो बाकीच्यांच्या तोंडाकडे बघूं लागला.

त्याचं चुकलं नव्हतं. सगळ्यांनी माना हलवल्या. एकमुखानं निर्वाळा दिला, "खरं ! कमाल केली पोरानं."

"कुळकर्ण्यांचं डोकं." गुणाजी नाडकर्ण्यानं पण शेरा दिला.

"वामणाचं म्हण." भाऊनं चूक दुरुस्त केली, "अरे द्वारक्याला काळजी तुमचीच. काय ? खोटं तर विचारा गोळेसाहेबाला. त्याच्या पोटांत अल्सर चाळवलाय् म्हणतात. पोटदुखी सुरू झालीय्."

आणि भाऊ कुळकर्ण्यांचा छातीवरचा हात हळुहळु पोटापर्यंत उतरला.

कंपनीच्या मॅनेजराचं नांव निघालं मात्र आणि मग पुढं काय हा प्रश्न उरला नाहीं. आता काळोख पडेपर्यंत तरी दुसरा विषय निघणं कठिण होतं. राजाभाऊ गोळेबद्दल उपस्थित मंडळींत प्रत्येकापाशीं कांहींतरी सांगण्यासारखं होतं. तें नविन होतं असंहि नाहीं. त्याच त्या गोष्टी पुन्हा न् पुन्हा सांगितल्या तरी सांगणाऱ्यांची आणि ऐकणाऱ्यांचीसुद्धां पहिल्याइतकी किंवा अधिकच करमणुक होई. इतर कशालाच मग महत्व उरत नसे.

आणि या गप्पा ऐन रंगांत येतात न येतात तर बंड्या नावर वरचं आभाळ कोसळून तो सगळा भार जसा कांहीं आपल्या एकट्याच्याच टाळक्यावर पडला आहे अशा चिरडलेल्या जड चेहऱ्यानं ओटीवर हजर झाला.

त्यानं अंगणांतूनच रडगाणं लावलं, "भाऊ, मी नाहीं. तुमचा द्वारकानाथच बरा आहे–अधिक लायक."

एकाएकीं मध्येंच हा व्यत्यय आला म्हणूनहि असेल ! पण वामणांच्या कांग्रेशीला या बोलण्याचा अर्थ लागेना. एकाहून एक सगळेच हुषार, एरव्ही सुतानं स्वर्गाला जाणारे. आणि असं असूनहि बंड्या काय आणि कुठच्या संदर्भात बोलतोय हें त्यांना कळेना.










गोंधळलेल्या मुद्रेनं ते त्याच्याकडे बघत राहिले. बाबू नावराचं हें थोरलं पोरगं नाहीतरी बिलकुल वाया गेलं होतं. दिवसेंदिवस कारटा अधिकच वांड बनत चालला होता. दुसरं कांहीं नाहीं, पण फुकट जातीची अब्रू जात होती. आणि आजतर वंड्या तर्र होऊन सरळ भाऊ कुळकर्ण्यांच्या दारावर आला होता. म्हणजे वडील माणसांची देखील भीडमुर्वत राहिली नव्हती त्याला.

भाऊ कुळकर्णी बसल्या जागेवरून शेकोटीच्या जाळासारखा एकदम उसळला. ओरडला, "बेशरम ! चल निघ, तिथं पायरीवर-सुद्धां उभा राहूं नकोस आमच्या."

"नाही जाणार." वंड्यानं पायरीवरच ठाण मांडलं." "आधी प्रॉमीज—वचन द्या."

"थोबाडांत देईन."

"चालेल ! पण नाही उभा रहाणार." वंड्यानं उत्तर दिलं. "कारण—कारण माझ्यानं तें होणारच नाहीं. नाहीं तें काय या भाऊचं एक एक—"

"अरे, पण काय वंड्या ?" वाळ्या नावरानं पुतण्याला विचारलं.

"कर्म वाळूकाका ! दाजींनी केलं. आणि भाऊ तें माझ्या माथ्या-वर लादूं बघतात. तर आतां कसं करायचं ?"

"दारू पिऊन रांडांच्या दारांत पड लोळत." भाऊनं मार्ग दाखवला, "जा, हो चालता. परत पाऊल टाकूं नकोस माझ्या घरीं."

"आतां पण येणार नव्हतोंच—"

"मग कोणी धाडलं ? त्या रांडेनं, सावित्रीनं ?" भाऊनं वर्मावर घाव घातला.

तसा मात्र वंड्या नावर चवताळला. कुत्र्यासारखा वस्कन् अंगावर आला, "तिचं नांव काढूं नका भाऊ, सांगून ठेवतों. एकदम मायं फिरतं माझं. खून चढतो. हां ! . . . द्वारकानाथच म्हणाला—"

"आं ! द्वारकानाथ ? काय म्हणाला ?" गुणाजी वरा गप्प बसेल ? त्यानं मध्यें तोंड घातलंच.

---

## दीपावली बुद्धिबळ क्र. २ चे विजेते

(१) **श्री. सुधाकर एस. व्यवहारे,** अध्यापक, अमर विद्यालय, अमरापूर, जि. बुलढाणा. (२) **पुष्पा गोपाळ वैद्य,** ३६, गुडवुईल् बिल्डिंग, माहिम, मुंबई–१६. (३) **वसंत रामचंद्र तडवलकर,** २८, मुकुंद मॅन्शन, रानडे रोड, दादर, मुंबई–२८. (४) **सौ. हिराबाई खारकर** बी. ए. बी. टी., सुपरव्हायजर, बी. पी. एम. हायस्कूल, १६ वा रस्ता, खार, मुंबई–५२. (५) **जनार्दन लक्ष्मण म्हात्रे,** C/o ॲटलास इन्शुरन्स कं. लि. इंदू हाऊस, डूगल रोड, पो. बॉ.नं. ८, मुंबई–१.

वरील पांच अचूक विजेत्यांना दीपावली मासिक एक वर्ष भेट म्हणून पाठविण्यांत येईल.

---

"म्हणाला कीं ह्या बैठकींत भाऊ माझं नांव सुचवणार. पंचा-यतीच्या जागेसाठीं. दाजींनी राजीनामा दिला त्या—"

"तुझं ?"

वंड्याला पुढं कोणी बोलूंच दिला नाहीं. एका प्रश्नांतच खतम केला. ओटीवर एकदम हास्याचा धबधबा कोसळला. मंडळी खोः खोः हंसूं लागली. पोट धरून, पुढचं मागचं सगळं विसरून. म्हणजे नसताच विनोद झाला होता. दारुच्या नशेंत तर्र असला म्हणून काय झालं ? वंड्याला निदान इतकी तरी शुद्ध जरूर असायला हवी होती !

एकट्या गुणाजीला दया आली वंड्याची. सहानुभूतीनं तो म्हणाला, "द्वारकानाथानं चेष्टा केली तुझी वंड्या."

"नाहीं. तो सिरीयसली बोलला." वंड्या ऐकून घ्यायला तयार नव्हता.

"अरे गुणाजी, मीच म्हटलं होतं द्वारक्याला." भाऊ कुळकर्ण्यानं मग सावकाश खुलासा केला. थंडपणं, खास खाजगी आवाजांत. "माझा विचार होता, या वंड्याला कुठंतरी गुंतवायचा. त्याच्या या बाकी उचापती तरी कमी होतील. पण—पण तें शक्य नाहीं दिसत. हा तर असा नालायक कुठच्या तोंडानं तुमच्यापुढं मी याचं नांव घेऊं ? आं !"

पण हें खोटं होतं. सगळं नाटक होतं. भाऊ कुळकर्ण्यांच्या टाळक्यांत असा विचार येणं अशक्य होतं. म्हातारा चकवीत होता. आपल्या लेकाचा डाव त्याच्या ध्यानांत आला होता. आणि तसं त्यानं बोलणं फिरवलं होतं, सूर बदलला होता. गुणाजी नाडकर्णी सोडल्यास, सगळेच या नाटकाला फसले, चकले.

वंड्या नावर तर पहिला. तो लटपटत उभा राहिला. मारे आवेशानं ओरडला, "कबूल भाऊ ! आम्ही नालायक ! त्या म्हातारड्या देवळाला पाडायला सांगा. तें काम आपलं. कमरेतून साफ मोडून घालतों. पुन्हा उठणारच नाहीं. पण निवडणुकीला मात्र उभा करूं नका मला. द्वारकानाथाला करा. दुसरा लायक माणूसच नाहीं."

"वंड्या, तुझ्या मारामाऱ्या मला नामंजूर. काय ?" भाऊनं त्याला अर्ध्यावरच कटवला, "आणि द्वारकानाथापेक्षांहि लायक माणसं आपल्यांत कांहीं कमी नाहीत. गाढवासारखं मल्लंच बोललं मला नाही खपणार."

खरं म्हणजे भाऊच्या या मखलाशीची जरूरच नव्हती. जमलेल्या मंडळीनं निर्णय घेऊन टाकला होता.

"अण्णाविरुद्ध द्वारकानाथालाच उभा करू या भाऊ." सग-ळ्यांनी एकमुखानं कौल दिला.

भाऊ कुळकर्णी कृतकृत्य होऊन टाळूवरून हात फिरवीत बसला. गुणाजी नाडकर्णी आपल्याशींच हंसत राहिला. म्हणजे त्याला हा अंदाज होताच.

(क्रमशः)

अनुक्रमणिका

















मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



*चंदूने त्याला छातीशीं घट्ट आवळून धरले. सर्वांना हंसणारा रंगा आज स्वत:च खूप रडला.*

*तो मुसळासारखा ताठ उभा होता. तरी तो दुसऱ्यांना हंसत होता.*

*पण त्या दिवशीं........*

—जयवन्त दळवी




**कमरेंतली** दुखापत चुचकारत रंगाजी त्या वेंताच्या खुर्चीत पोतडी ठेवल्यासारखा वसला. तो वसल्यावरोवर त्याचें शरीर आपोआपच वांकडें झालें. ती खुर्चीच तशी होती. सरळ अंगानें वसायचें म्हटलें तर वसणें शक्यच नव्हतें. सारी खुर्चीच कंवर मोडल्यागत वांकली होती. खुर्चीच्या दोन्ही वाजूंना स.य-कलचा टायर वसवला होता म्हणून वेताच्या काड्या कावूत होत्या. तो टायर काढला तर काड्या वेगवेगळ्या झाल्या असत्या आणि खुर्ची खाली वसली असती. ती खुर्ची आणि त्या खुर्चीत टाकलेली कापसाची उशी. गेलीं कित्येक वर्षें ही दौलत रंगाजी पहात होता. भाऊच्या दोन खणी संसाराचा हा कळस होता. समाईक गॅलरींतून भाऊची खोली ओळख-ण्याची खूण म्हणजे खोलीच्या दारांतच ठेवलेली ही वेंताची खुर्ची.

त्या खुर्चीत रंगाजी वसला आणि वेड्यासा-रखा वेडेंवांकडें तोंड करीत वोटांची नखें खाऊं लागला. नखें खाण्याची ही संवय त्याला हॉस्पिटलमध्यें लागली. तीन चार महिने त्यानें हॉस्पिटलमध्यें काढलें. तिथें नर्सींग करतांना त्या दोन फाजील नर्सी चेष्टेच्या सुरांत खुदुखुदु हंसायच्या. त्या हंसल्या कीं रंगा-जीचा चेहरा स्वाभाविकच ओशाळायचा. त्याच्या कॉटशीं त्या आल्या आणि त्यांनीं लेंग्याची नाडी सोडली कीं त्या एकमेकीकडे पाहून हंसायच्या. आणि मग कांहीं न सुचल्यामुळें रंगाजी स्वत:ची नखें खात रहायचा.

सुरवाती सुरवातीला त्याला राग यायचा. वाटायचें, होय, परिस्थिति आली आहे म्हणून हंसतां आहांत. हंसा, हंसा. बरा असतो तर तुम्ही आपणहून मागें लागलां असतां. त्यावेळीं तुमची मिजास चालूं दिली नसती. पण रंगाजी परिस्थितीनें आंखडला होता. त्यामुळें त्यांच्या कुत्सित हंसण्याकडे त्याला दुर्लक्ष करणेंच भाग होतें. हंसा, लागेल तेवढें हंसा असें मनां-तल्या मनांत म्हणत तो छताकडे बघायचा आणि नखें खात गप्प रहायचा. तीच त्याला संवय लागली.

खुर्चीत बसल्या बसल्या नखें खातांना तो तल्लीन झाला. नखें कुरतडतांना त्याला बरें वाटायचें. नख गुळगुळीत होईपर्यन्त तें चावतांना त्याचें भान अक्षरशः हरखून जायचें. आणि कांही क्षण आपोआप नाहीसे व्हायचे. आयुष्याचे क्षण घालवणें हें जिकिरीचें काम असतें हें त्याला हॉस्पिटल-मध्यें पडल्यानंतर प्रथम कळलें. त्यापूर्वी घालवायला पाहिजेत असे क्षण कधीं आलेच नव्हते. क्षणाक्षणांचेंच आयुष्य असते याची सुद्धां त्याला कल्पना नव्हती. त्यानें आयुष्याचा असा कधीं विचारच केला नव्हता.

भाऊ म्हणायचा, "रंगा, आतां तूं आयु-ष्याचा विचार केला पाहिजेस.'

आयुष्याचा विचार करायचें? म्हणजे काय करायचें. रंगाजीला कधींच कळलें नाहीं. तो एकदम तुसडेपणानें हंसायचा. आणि वाऱ्यावर जायचा. म्हणतां म्हणतां दृष्टिआड व्हायचा.

"रंगा, तुला फॅक्टरींत लावून देतो. एकदां मार्गाला लाग. नोकरी कर. लग्न करून देऊं".

रंगाजीच्या पायांत साखळदंड टाकायची भाऊनें खूप धडपड केली. आपण थोरला भाऊ म्हणून आपले कांहीं कर्तव्य आहे आणि आपल्याला तें पार पाडलें पाहिजे असें भाऊला वाटायचें. पण रंगाजीनें त्याला दाद दिली नाहीं.

आईनें शेकडों व्रतवैकल्यें केलीं. उपास-तपास केले. सोळा सोमवार पार पाडले. नवसासाठीं कुठला एक देव मोकळा ठेवला नाहीं. पण रंगाजी सूतभर मुद्दां वळला नाहीं.

महिन्याकाठीं तो पंधरा रुपये आईच्या हातीं द्यायचा. आणि त्या बदलीं खुर्चीशेजारी गॅलरींत झोपायचा. सकाळीं एकदां गरम चहा प्यायचा. उन्हाळा असो हिवाळा असो, नळाखालीं बसून आंघोळ करायचा. ओल्या कपड्यांचे पिळे तिथेंच टाकून भराभर कपडे चढवायचा. जायला उशीर झाला आहे असें भासवीत घाईघाईनें पळ काढायचा. तो मग रात्रीं अपरात्रीं कधीं तरी आलेला असायचा. बाहेर गॅलरींत वळचणीला पडल्यासारखा झोप-लेला असायचा. कधीं कधीं येतहि नसे. मग आईच सकाळीं वळकटी आवरून ठेवीत असे. त्याचे ओलें कपडेहि कंबर मोडून तीच धूत असे.

कुठें कामाला आहे म्हणावें तर एखादा दुसरा दिवस तो घरींच ठाण मांडून बसायचा. मग सबंध चाळभर गडबड करीत रहायचा. अण्णारावांचें आणि त्याचें भांडण सुरू व्हायचें. भांडणाला कारण सुद्धां किती क्षुल्लक असायचें. गच्च अंबाडा घातल्यासारखी शेंडीला गांठ मारणें हा अण्णारावांचा छंद. पण शेंडीचें टोंक ओढून त्यांची शेंडी सोडण्याचें रंगाला काय कारण? पण विनोद म्हणून तो तसें करायचा. आणि दोघांच्या वाचावाचीनें सारी चाळ जमा व्हायची.

जगूअण्णानें आपल्या धोतराची कांस सैल घातली तर बिघडलें कुठें? आपण आपलें धोतर कसें नेसावें हा ज्याचा त्याचा प्रश्न! पण जगूअण्णांच्या नकळत रंगाजी त्यांची कमरें-तून कांस उपटायचा आणि पळत सुटायचा. मग त्याला पकडण्यासाठीं जगूअण्णा धांवायचे. अनेकदां सुटलेल्या कांशीवर त्यांचाच पाय पडायचा आणि त्यांचें धोतर सुटण्यांत पर्यव-सान व्हायचें. मग सारीं पोरें टाळ्या पिटून हंसत रहायचीं. त्यांत मोठ्या मोठ्या बायका सुद्धां सामील व्हायच्या.

"मांच्योताची एकदां हाडंच सैल करतो. सोडत नाहीं.. .." असें म्हणत धांपा टाकत जगूअण्णा सुटलेलें धोतर सर्वां समक्ष नेसायचे.

डालडाच्या डब्यांतली तुळस पार्वतीबाईनीं गॅलरींत टांगली होती. रोज सकाळीं आंघोळ झाली कीं स्तोत्रें गुणगुणत त्या ताम्हणांतलें पाणी तुळशीच्या डब्यांत टाकत. त्यावेळीं वरून पडणारें पाणी चुकवण्यासाठीं रस्त्या-वरल्या पादचाऱ्यांची धांदल होई. खालून कोणी तरी शिव्या घातल्या तर त्याहि वर ऐकूं येत. तथापि पार्वतीबाईच्या या पवित्र कार्यांत कधीं खंड पडला नाहीं. एकदां, आंघोळ होतांच हातांत ताम्हण घेऊन त्या ओलेत्यानें गॅलरींत आल्या आणि अगदीं संवयीनें त्यांनी पाणी ओतायला आणि तिथें तुळस नाहीं हें त्यांच्या ध्यानीं यायला एकच गांठ पडली. त्या थक्क झाल्या.

शेजारीं रंगाजी गालांत जीभ घोळवीत उभा होता.

त्यामुळें पार्वतीबाईंना शंकाच उरली नाहीं.

"रंग्या, तूं हालवलीस माझी तुळस.." त्या कडाडून म्हणाल्या.

"हो! मीच हालवली!" रंग्या शान्त-पणें म्हणाला.

"पण कां हालवलीस?" बुबुळें बाहेर येतील एवढ्या जोरानें ती ओरडली.

"पण कां हालवूं नये?"

कां हालवूं नये हें पार्वतीबाईंना सांगतां येईना. त्यामुळें त्या चडफडत त्याच्यावर डोळ्यांतून आग पाखडत राहिल्या.

"अरे रंगा, पण तूं असं कां करतोस? कां हालवावी आपण तुळस?" त्याची आई सुद्धां मध्यें पडली.

"अग, पण गॅलरींतच तुळस टांगायला पाहिजे असं शास्त्रांत आहे?"

"पुरे तुझं शास्त्र! तुळस कुठें आहे सांग!" आईनें हात जोडले.

"ती पाठीमागें टांगली आहे. तिथं पाणी घातलं म्हणून काय झालं?"

"तुझ्या बोडक्यावर पाणी घालते!" पार्वतीकाकू आंत जातां जातां कडाडल्या.

कमळाजी ही चाळींतली सर्वांत गरीब मूर्ति. पण तीहि रंगाजीच्या तावडींतून सुटली नाहीं. कमळाजीला 'तें कमळ' असें चाळींत म्हणतात तें या रंगाजीमुळेंच. कमळाजीचें






लग्न झाल्यानंतर त्यानें बायकोला हाताचा सुद्धां स्पर्श केला नाहीं. म्हणून आपल्या कर्माच्या आणि कमळाजीच्या नांवानें खडे फोडत ती माहेरीं गेली. त्यामुळें कमळाजी नंपुसक आहे अशी चाळभर थोरामोठ्यांनीं चर्चा केली. पण 'तें कमळ' हें त्यांचें नांव रंगाजीनें अख्ख्या चाळींत लोकप्रिय केलें.

कमळाजी गॅलरींतल्या पेटीवर बसलेला दिसला कीं रंगाजी ओरडलाच, "हें कमळ बसलें आहे !" हें आणि बसलें या शब्दां-वरील अनुस्वार तो जोर देऊन उच्चारायचा.

बिचारा कमळाजी एकदम उठून उभा रहायचा. आणि गॅलरींत फेऱ्या मारू लाग-यचा. कमरेच्या एका पंच्यानिशीं उघड्या अंगानें तो दिवसभर गॅलरींत फेऱ्या मारा-यचा. अठरा पावलें टाकलीं कीं उजव्या हातानें तीनदां टाळू थापटायचा. यांत अर्थ नव्हता. पण ती त्याची संवय होती.

त्याची अठरा पावलें होण्याआधींच रंगाजी आडवा यायचा आणि आपल्या हातानें कमळाजीची जोरानें तीनदां टाळू थापटायचा. त्यामुळें कमळाजीचे डोळे गडबडून वाकडे तिकडे व्हायचे,

"काय रे रंगाजी ? असें काय करतोस?" आपले हालणारे दांत सांभाळत कमळाजी म्हणायचा.

"कमळ, गोवेकरणीला पोरबाळ नाहीं होत. घेतोस कंत्राट ?"

"काय रे बोलतोस ?" कमळाजी एकदम लाजायचा, आणि तोंडांतून प्राण गेल्यासारखा निर्जीव हंसायचा. रंगाजी बाजूला होतांच पुन: अठरा पावलांचें सत्र तो सुरू करायचा.

रंगाजी असें कां करतो हें इतरांना जसें कधीं कळलें नाहीं तसें खुद्द त्यालाहि कधीं कळलें नाहीं. कां हा प्रश्नच त्यानें कधीं स्वत:ला विचारला नाहीं. त्यामुळें बिचारी आई मात्र अक्षरश: जाचून जायची. हा पोर घरीं राहून अशा कटकटी करण्यापेक्षां बाहेर शेण खायला गेला तरी परवडला असें तिला व्हायचें. कधीं कधीं ती गदगदून म्हणायची, "रंगा रे, असं वेड्यासारखं आपण वागू नये. अशानं लोक तुला वेडा म्हणतील !"

पण रंगा वेडा नव्हता. अनेकांना तो वेडसर वाटायचा. पण तो वेडा नव्हता. मनाला चार घटका विरंगुळा मिळावा म्हणून तो या माकडचेष्टा करायचा—कीं काय कोण जाणे !

रंगाजी शान्तू शिप्याकडे नेमानें जायचा. शान्तू चाळीशी उलटलेला कसबी शिंपी होता. बायकांचे पोलके, मुलींचे झगे शिवण्यांत तो पटाईत होता. दुर्वासारखें दिसणारे त्याचे केस अधून मधून पुंजक्या पुंजक्यांनीं पिकले होते. पंडु रोग झाल्यासारखा तो पिवळा पिवळा दिसायचा. एका कानावर आडवी पेन्सिल आणि दुसऱ्या कानावर सुई ओव-लेला धागा. मांड्या दुमडून चटईवर बसायचा आणि कापड बेतायचा. अख्खा दिवस पानाचा चोथा तोंडांत चाळगून मख्खपणें बसलेला असायचा. पानाचें निमित्त करून तोंड मिटून कातर चालवायचा. काजें पाडायच्या मशीनवर बसून रंगाजी काजें करायचा.

आपल्या तरुण बायकोशी रंगाजीचा संबंध आहे हें शान्तूला माहीत होतें. पण म्हणून शान्तूनें त्याच्याशीं वैर धरलें नाहीं कीं दुकानांत येऊं नको असें म्हटलें नाहीं. उलट कधीं कधीं शान्तूच त्याला बायकोचा निरोप द्यायचा.

"रंगाजी, आज बोलवलंय तुला. चक्कर टाकून ये.—"

रंगाजी शान्तूच्या घरीं जाऊन यायचा. परत आल्यावर दुकानांतल्या लोडाला टेकून डोळे मिटून रंगा स्वस्थ पडायचा.

"अरे चार काजं मार—" शान्तू आपल्या-शींच बोलल्यासारखा बोलायचा.

"झक मारतात तुझीं काजं—" असं म्हणून रंगाजी लोडावर आडवा पडायचा. थोड्या वेळानें खर्ज लावून सूरांत घोरायचा.

संध्याकाळीं जाग आली म्हणजे मग दिवसच त्याला उजाड आणि भकास दिसायचा. डोळ्यांना आंधळेपण आल्यासारखा तो समोर बघत रहायचा. कसल्या तरी विचारांत गुरफटून जायचा. निराळाच रंगू जन्माला येऊन आपलें जग कोठें आहे याचा वेध घ्यायचा. बराच वेळ तो भकास वातावरणांतला किळस-वाणा दर्प हुंगत बसायचा. मनानें आणि तब्येतीनें अधु होऊन जायचा.

टाके मारतां मारतां शान्तू त्याच्याकडे विस्मयानें बघत रहायचा. आल्यागेल्याची टर उडवणारा हा उनाड पोर — याला झालें काय असा त्याला प्रश्न पडायचा.

"रे रंगाजी.." तो हांक मारायचा.

रंगाजीच्या कानाला बहिरेपण आलेलें असे.

आज फार लवकर आलांत वाटतं···· अन् तेहि याटांत····!

डोळयांतून आणि नाकांतून झिरपणारी ओल पुसत शान्तू रंगाजीकडे बघत रहायचा.

"तुला झालंय काय ? मधून मधून काय घाड भरतेय ?" शान्तू म्हणायचा.

"च्– च्" असा तोंडानें आवाज करीत कांहीं तरी चुकल्याबद्दल रंगाजी चुटपुटायचा.

"झालं क य ?"

"कांहीं नाही ! दोन दिवस येणार नाहीं मी.." असें म्हणून तो मचूळ तोंडानें तिथून उठायचा तो घरच्या वाटेला लागायचा.

त्याचें मन खिन्न व्हायचें. शान्तूच्या बायकोचा त्याला अतोनात राग यायचा. काम झालें म्हणजे दर वेळीं ती म्हणते, "मला घेऊन चल. त्या अडाण्याच्या हातून मला सोडव !"

शान्तूच्या बायकोचा त्याला राग यायचा. शान्तूबद्दल कांठोकांठ दया बाटायची. तिला उचललें तर त्या गरीब शान्तूचें काय ? काय करील बिचारा ? कुठें जाईल ? कुठ खाईल त्याच्या अन्नचें काय ? लोक त्याच्या तोंडांत शेण घालतील ..बस्स ! हें खूप झालें. आतां शान्तूच्या दुकानाची आणि त्याच्या घराची पायरी चढायची नाहीं.

असा निर्धार त्यानें खूपदां केला.

तरीहि त्यानें पुनः एकदां तोच निर्धार केला.

तो दुकानांतलें लोड बाजूला सारून उठला. आणि वैतागानें म्हणाला, "शान्तू, तूं दुसरा माणूस ठेव. मला हें काम झेपायचं नाहीं !"

तो ताड ताड दुकानाची पायरी उतरला.

शान्तू कांहीं बोलला नाहीं. वळून त्यानें रंगाजीकडे पाहिलें. पाझरणारे डोळे त्यानें धोतरानें पुसले. ओलें झालेलें नाक मुठीनें वाकडें तिकडे केलें आणि 'येईल दोन दिवसांनीं' असें मनाशींच म्हणत तो गप्प बसला.

ढेपाळलेल्या मनानें रंगाजी घरीं आला. घरीं येतांच त्यानें आपलें मन झटकल्यासारखें केलें.

कमळाजी गॅलरींत पावलें टाकून नुकताच पेटीवर बसला होता.

"हें कमळ बसलें आहे !" असें तो ओरडला आणि मोठमोठ्यानें हंसला.

कमळाजी वर उडाल्यासारखा उठला आणि गॅलरींत पावलें टाकूं लागला. त्याच्या



## —सिनिक्

'माझे भाडेकरू आहेत वीस वीस वर्षांपूर्वीचें. दृष्ट लागेल असा प्रत्येक फ्लॅट आहे. पण कुणालाहि काढता येत नाही आणि माझा वाढता खर्च कांहीं मागत नाही'.

–असाच एक चार खोल्यांचा फ्लॅट

–प्रत्येक खोलीला एक गॅलरी .........

मागच्या गॅलरीत अडगळीचे सामान. ही खोली पिछाडीला आहे. या सामानांत मोडकी खेळणी, रद्दी, नक्षीकामाच्या निकामी फ्रेम्स इ. इ. सामाना बरोबरच औषधाच्या, सुवासिक तेलाच्या रिकाम्या बाटल्या, रहस्यकथांची पुस्तकें, पोकळ झालेल्या लिपस्टिकच्या कांड्या इ. इ. सामान कुणालाहि दिसलें असतें. पण हें घर आहे तिसऱ्या मजल्यावर.

–राहिलेल्या तीन गॅलरींत दर्शनी (रस्त्याच्या बाजूला) गॅलरींत फुलांची कुंडी दिमतात. एक वेलहि नखरेलपणाने फडफडतांना जाणवतें. पोपटाचा पिंजरा पण आहे......काय म्हणतो बरे तो ? मालक म्हणतात 'बाई कुठे गेल्या ? साला पंखा चलाव.....' आणि पोपट हुबेहूब पुनरुक्त करतो.

–थोडा उजवीकडे वळसा घेतला तर दुसरी गॅलरी आहे. तिथे कपडे दिसतात· फ्रॉक, गंजी फ्रॉक, साड्या, पैजामा-होय, कांहीं दिवसापूर्वी मधून मधून ओलें धुपटे पण नजरेस पडायचें.

–या गॅलरीला चाटून दोन मोठ्या खिडक्या आहेत. या खिडक्या भिंतीच्या वर्तुळाकार असल्या तरी खिडक्यांचे गुलाबी पडदे लक्षवेधक आहेत. भर दुपारी किंवा कातर वेळेस हे पडदे जरासे सारले जातात आणि त्यांतून दोन डोळ्यांतली एक नजर रस्त्यावर झेपावत असतें.........

खिडक्या संपल्यावर या घराची उरलेली गॅलरी आहे. तिथे टांगलेलें तुळसीचें झाड दिसतें. गॅलरींत पाण्याचे दोन माठ दिसतात. या गॅलरीच्या खालीं जे ओणवे झालेलें शेड्स आहेत. त्यांच्यावरची अंड्याची टरफले खाली उडी घेण्याच्या बेतांत असल्यासारखीं वाटतात...

बैठकीच्या खोलींत प्रवेश केल्यावरोबर मऊ मऊ अशा सोफ्यावर घरची गुबगुबीत सुंदर मांजरीण विसावलेलीं आढळतें....कुणाची तरी चाहूल लागते परंतु विचारपूस कुणीच करत नाही....

भिंतीवर कसले तरी रंगीत चित्र दिसतें. नक्कीच नुकत्याच झालेल्या फ्रान्सच्या वारीत आणलेलें असावें, होय, पूर्वी त्या ठिकाणी महात्मा गांधीचा फोटो होता....

—ज्यावर रेडिओ ठेवलेला आहे त्या नावीन्यपूर्ण कांचेच्या कपाटांतली पुस्तकें गेली पंधरा वर्षें अगदी नवी करकरीत आहे. छे, छे, ही दूषित दृष्टी आहे; नुसती दूषित नव्हे तर पूर्वग्रहदूषित आहे. नीट पाहिल्यास त्यांत नवीन भरहि दिसेल....नाही, या कपाटांत नाहीं–येथें शेली, शेक्सपिअर, डिकन्स, येन्-सायक्लोपिडिआ ब्रिटानिका, गोल्डस्मिथ स्माईल्स, स्कॉट, बायरन, गिबन इ. इ. गेले पंधरा साल मुक्काम ठोकून आहेत. नव्या लेखकांचा आणि साहित्याचा तलास घ्यावयाचा असल्यास दृष्टी जरा वर गेली पाहिजे–

अनुक्रमणिका

तिथें भिंतीत एक लांबुळके शेल्फ आहे. या शेल्फमध्यें नेहरू, राधाकृष्णन्, चर्चिल लिंकन्, हिटलर, ज्ञानेश्वर, हेमिंग्वे, कामू, काफ्का, विठ्ठलराव घाटे, चिंतामणराव कोल्हटकर इ. इ. ची हजेरी आहे...

दुसरी खोली स्पष्ट दिसत नाही. कारण मधल्या दाराला पडदा आहे. पण या खोलीत कपाटे आणि पलंग यांनी भिंतीशी सलगी केली असावी—असें अनुमान काढावयास अवसर आहे. आंत ग्रामोफोनवर 'म्—म्—मका....' ही एका मराठी बोलपटाची रेकॉर्ड चालू आहे. आणि कुणीतरी (नक्कीच दहा-बारा वर्षाची असेल) स्वतःभोंवती गिरकी घेत आहे.... पलंगाखाली आलेलें पाय दिसले: गोरे, पुष्ट आणि लुसलुशीत. प्रथम परकर व नंतर रंगीत साडी, पायावर घरंगळली—रेकॉर्ड संपली....कपबशांचा आवाज ऐकू आला. ..

तिसऱ्या खोलीचें एवढे सुद्धा दर्शन शक्य नव्हते. काय असेल तिथें ? होय, बरोबर,—अगदी बरोबर—पाळणा असेल, पेटचा असतील. त्या पेटचांतून वैभव बंदिस्त असेल. या चार खोल्यांतल्या देहांना सुखाचा स्पर्श करणारे, त्यांना झाकणारे आणि खुलवणारे कपडे असतील...

—परंतु तिथें पाळणा नव्हता. पेटचा होत्या. दोन खुर्च्या व एक आराम-खुर्ची होती. एक मोठा छप्परी पलंग होता. एक मोठा आरसा पलंग पूर्ण दिसावा अशा बेताने भिंतीत बसवला होता. उन श्वास, उसासे, घर्म, तळमळ, प्रतीक्षा, वुजलेल्या आणि थिंथरलेल्या नजरा—ही सर्व या वेटचा आरशाने आपल्या अंतःपुरांत नक्कीच सांठवली असतील. पलंगावरच्या चादरीवर एकहि सुरकुती नव्हती. उशा कशा फुगीर होत्या.....

—या खोलींत भिंतीवर कांहीं फोटो होते. एक लग्नांतला दोघांचा होता. दुसरा सहा-सात व्यक्तींचा मिळून होता. कुटुंबाचा एकत्र असावा.

—कपाटावर मात्र न टांगलेले दहा-बारा फोटो होते. एकांत डोळचावर चश्मा नव्हता तेव्हांची छबी होती. दुसऱ्यांत इंग्रजी साहेबाबरोबर सुटाबुटांतला अवतार होता. तिसरा झेंडावंदन करतांनाचा गांधी टोपींतला होता. चौथ्यांत मिसेस कुणाबरोबर तरी सस्मित हस्तां-दोलन करत असल्याचें दृश्य होतें. पांचव्यांत एकदम सारी नवी मंडळी दिसत होती. बहुतेक स्थूल, टक्कल पडलेलें आणि उंची पोषाखांतलें. सहव्यांत मालक विमानाने परदेशी प्रयाण करत असल्याचे कळत होते. उरलेलें अगदी अलीकडचें आणि विशेष नव्हतें......

चवथी खोली स्वयंपाकाची, तिचे काय सांगू ? या घरी कधीं जेवलो असेन तर ना ? जेवायलाच कशाला हवे ? सुबूर, सांगतो—विजेची व्यवस्था आहे. कांदे-बटाटे भरपूर आहेत. ताज्या भाज्या दिसत नाहींत. डाल्डाचा नुकताच उघडलेला डबा दिसतो आहे. परन्तु गडी माणसे कामावर न आल्यामुळें स्टेनलेसच्या भांडचांची पंचायत झाली आहे आणि मंडळींची तारांबळ उडाल्यासारखीं भासतें. रिफ्रेजेटर उघडा पडला आहे. त्यांत थोडे दूध, फळें, पाण्याच्या बाटल्या दिसत आहेत. फळें चिरायची आहेत. सुरी सांपडत नाहीं. कुठे गेली ? कुणी नेली ? गडी माणसांची अनुपस्थिती आणि सुरीचे नाहींसे होणें यांचा अर्थाअर्थी कांहीं संबंध असेल काय ?

——काय नेम ? आज कसली शाश्वती नाही ! अगदी क्षुल्लक कारणावरून खून होतात. पत्ता लागत नाही. मरणारे मरतात पण आमचा नोकर म्हणून लफडे आमच्या अंगाशी यायचे.....विनाकारण कोर्ट-कचेऱ्यांच्या खेपा कराव्या लागतील....काय जमाना आला ! ....

——एकदाची सांपडली, सांपडली ? खरोखरच सपडली. कुठे होती ? कशाकरता जागची हलवली ? त्या त्या जागेवरच्या वस्तु अशा हलतात कशा ? सर्व तंत्रच बिघडले आहे ! ....शिस्त अशी कशाला राहिली नाही....उगाच मनाला ताप.... ●●●

टीप:— पॉप्युलर प्रकाशनतर्फे प्रकाशनाच्या वाटेवर असलेल्या लेखकाच्या आगामी कथासंग्रहांतून

वाटेंत रंगाजी उभा राहिला आणि त्याच्या टाळूवर तीनदां हात आपटला.

तेवढचांत डाव्या हातांत टमरेल धरून अण्णाराव खोलीकडे परत येत होते. त्यांच्या-कडे पाहून मोठचानें हंसत रंगाजी ओरडला, "काय अण्णाराव ? कितवी खेप ? खा—खा.."

अण्णारावांना चूळ भरायची होती. म्हणून ते कांहीं बोलले नाहीत. पण रंगाजीचा डांव आगाऊ हेरून त्यांनीं शेंडीची गांठ उजव्या हातानें घट्ट पकडून ठेवली.

रंगाजी खदखदां हंसत राहिला.

आपल्या खोलीकडे वळतांना त्याला जगूअण्णा जिना चढतांना दिसले. आज जगूअण्णांनी थेट साहेबी पोषाख केला होता. पॅंट, बूट, टाय आणि पावसाळी प्लॅस्टिक कव्हर घातलेली हॅट. कोटाचीं बटणें लागत नव्हती. पण त्यांनीं ती अट्टाहासानें लावलीं होतीं. जगूअण्णाकडे पहातांच रंगाजीच्या लक्षांत आलें, आज जगूअण्णांचा पेन्शनीचा दिवस. पेन्शन आणायच्या दिवशीं जगूअण्णा साहेबी पोषाखांत जात. आणि जगूअण्णांची जानकी-बाई काल परवांच लग्न झाल्यासारखी त्यांची वाट बघत गॅलरींत उभी राही !

हुश्श करीत जगूअण्णांनीं गॅलरींत पाय ठेवतांच रंगाजी मोठमोठचानें हंसला. हा असा वेडचासारखा कां हंसतो आहे तें जगूअण्णांना कळलें नाहीं. म्हणून त्या हंसण्याशीं आपला संबंध नाहीं असें भासवीत त्यांनीं हॅट काढली.

"अरे हो ! आज साहेबांचा पेन्शनीचा दिवस !" असें म्हणून रंगाजी ओरडला, "चला रे मर्दानों, आज आपण जगूअण्णांची तिजोरी लुटूं !"

त्याचक्षणीं त्यानें पोरकटपणें त्यांच्या पोटाला विळखा घातला.

"असं काय करतो हा कर्मचांडाळ पोर ?" असें म्हणत जानकीबाई त्यांच्या मदतीला धांवली.

तेवढचांत त्यांच्या कोटाचीं तिन्हीं बटणें तुटून खालीं पडलीं.

जगूअण्णांनीं स्वतःला सोडवून घेतलें. आणि ते आपल्या खोलींत पळाले. कोट

[पान ४३ वर]






आस्ट्रेलियाचे सुप्रसिद्ध चित्रकार श्री. जॉर्ज मोलनार यांची जुलै अंकापासून सुरुं झालेली व रसिक वाचकांना आवडत असलेली....

# हींच तीं व्यंगचित्रात्मक



अनुवादक : दि. श्री. कराडकर

**केंब्रिज :**

स. न. वि. वि.

केंब्रिजला जायचं कां, तर 'केंब्रिज–टाय्' घालायला मिळतो म्हणून. आतां ह्या टाय्चा उपयोग इथें सगळेजण कंबरेला बांधण्यासाठी पट्ट्यासारखा करतात ही गोष्ट अलाहिदा.

केंब्रिजमध्यें अनेक महाविद्यालयें आहेत. तीं सर्व जुनीपुराणी आहेत.

प्रत्येक महाविद्यालयाची इमारत वैशिष्ट्यपूर्ण आहे. प्रत्येकाला इतिहास आहे. महाविद्यालय स्थापन होण्यापूर्वी त्या इमारतींत 'हातभट्टी' चा धंदा असे.

सूर्याची हालचाल पाहूनच इथें अजून वेळ सांगितली जाते. पण




सगळें साहित्याचे विद्यार्थी होतें तेव्हां हें ठीक होतं. आतां शास्त्रज्ञहि इथें 'तयार' होत असल्यामुळें वेळ अजमावण्यांत विनाकारण खूप गोंधळ उडतो.

केंब्रिजमधला विद्यार्थी इंग्रजी, ग्रीक व लॅटिन वाचूं शकतो. तो झंझावाती वाचन करतो. वेडा बनून सारखा वाचत असतो.

ह्या सगळ्या धडपडीमागें आयुष्यभर उरीं बाळगलेली एकच महत्त्वाकांक्षा असते—'बोट रेस' मध्यें ऑक्सफर्डचा पराभव करणें.

**हॉलंड :**

स. न. वि. वि.

सध्यां मीं स्केव्हेनिन्गेनच्या समुद्र किनाऱ्यावर आहे. जुहूपेक्षां हा किनारा मोठा आहे, लांबच लांब. मध्यता मनांत भरते.

उन्हाळ्यांतील एकमेव हवा खाण्याचें ठिकाण म्हणून हा किनारा प्रसिद्ध आहे. सबंध हॉलंड येथें धांवून येतं. कांहीं दिवसांसाठीं, कांहीं तासांसाठीं— इकडे उन्हाळा कांहीं तासहि असतो.

किनाऱ्यावर सगळ्यांचीच गर्दी. खुर्च्या, छत्र्या, स्नानयंत्रें, तंबू, डेकखुर्च्या, टेबलं, चटया, सतरंज्या, लहान लहान बादल्या, छोटी छोटी स्टुलं, आरामखुर्च्या, प्याले, बाटल्या ह्या सगळ्यांमुळें किनाऱ्याला उत्सवाचा दिमाख प्राप्त होतो. लांबून मध्ययुगीन काळांतील लष्करी राहुटी वाटावी.

डच आंघोळ करण्यांत पटाईत. ते वाटेल तेव्हां, वाटेल तिथें, वाटेल त्या अवस्थेंत आंघोळ करतात. स्त्रिया तर आंघोळीचा 'सूट' घालून फिरत असतात. आंघोळ करावीशी वाटली कीं आंघोळ करतात. एकदां... दोनदां... पंधरा वेळां......पंचवीस वेळां. आंघोळ केल्यावर प्रत्येकजण प्रत्येक वेळीं खास कांचेचं तावदान असलेल्या खोलींत बसून कॉफी ढोसतो.

हीं तावदानें त्यांचं वाऱ्यापासून संरक्षण करतात. छत्र्या उन्हापासून त्यांचं संरक्षण करतात. खुर्च्या वाळूपासून त्यांचं संरक्षण करतात. पण समुद्रापासून संरक्षण करण्यासाठीं त्यांच्याजवळ कांहींहि नाहीं. परंतु सागरच आपली मर्यादा ओळखून मागे हटतो.

पाणी तपकिरी रंगाचं आहे. १६° सें. तापमान आहे. फॅरेनेटमध्यें किती असेल ? जाऊं द्या झालं.

सागर, वाळू, सूर्य, मौज. आतां काय राहिलं ?

**व्हिएन्ना :**

स. न. वि. वि.

ह्या शहरावर अनंतकाळ सार्वभौम राजानें हुकमत गाजविली. कोर्टाच्या मोठमोठ्या इमारती दगडाच्या आहेत. इथले पुरुष हडेलहप्पी आणि स्वच्छंदी, बायका बसक्या नाकाच्या, जाडजुड आणि कामसू.








इथले लोक स्वप्नाळू. जागेपणींहि स्वप्नांचें रंगीबेरंगी फुगे उडवितात.

युद्धकालीन जखमा भरून निघाल्या आहेत. रशियनांचा साफ विसर पडला आहे. नव्यानें बांधलेल्या संगीत–सभागृहामुळें प्रत्येकाला आपण संगीतावरील श्रेष्ठ टीकाकार आहोंत असं वाटतंय्.

उकडतंय किती. पुतळेहि आनंदानें विरघळत आहेत जणं. मी आईसक्रीम खातोय् आणि पुतळ्याचा एक तुकडा माझ्या आईस्क्रीम-मध्यें पडला. त्यामुळें आणखीन्च चविष्ट लागतंय्.

**जिनेव्हा :**

•

स. न. वि. वि.

जिनेव्हा स्वित्झर्लंडमध्यें आहे. स्वित्झर्लंड म्हणजे शहाण्या लोकांचा प्रदेश. इथें जीवनाचे व्यवहार नाजुक हातानें केलें जातात. वेदनेला स्पर्श नाहीं. तपशीलाची अचूकता इथेंच सांपडतें.




सगळें निर्बंध तंतोतंत पाळूनहि चलनाची इथें चलती आहे. किमती स्थिर आहेत. प्रत्येकजण सुखवस्तु आहे.

ही आदर्श अवस्था इथल्या राजकारणी पुरुषांमुळें आली. त्यांचा कोणावरहि विश्वास नाहीं, स्त्रियांना मतं मुळींच दिलीं जात नाहींत. प्रत्येक गोष्ट मतदारांचा कौल घेऊन ठरविली जाते. दारुचा धंदा व हरघडीचं जीवन विस्कळीत न व्हावें म्हणून हें मतदान पोस्टानें होतं.

स्विसमध्यें तीन राजभाषा आहेत : फ्रेंच आणि जर्मन.

त्यांनी निर्माण केलेली घड्याळें 'परफेक्ट' असतात. कांहीं जास्तच. त्यामुळेंच सार्वजनिक मारतीवरील घड्याळें विसंगत वेळा दर्शवितात.

इथलं जीवन सुखावह, शहाणं, आणि काटेकोर आहे. काटेकोर जीवन जगून इथल्या लोकांना आतां वेड लागण्याची पाळी आली आहे. आपण उठल्यासुटल्या दंतवैद्याकडे धांवतो त्याप्रमाणें इथले लोक मानसशास्त्रज्ञाकडे धांवतात.

इथले सगळे लोक उपजत 'बुद्धिमान' आहेत. 'ढ' शोधूनहि सांपडत नाहीं

•

क्रमशः








चित्रपट सृष्टीशीं अति निकटच्या संबंधितांपैकीं श्री. देशमुख हे एक होत. सध्या ते मराठी रंगभूमीचा सव्वाशें वर्षांचा इतिहास चित्रित करीत आहेत. छायाचित्रकलेंतलें त्यांचें यश फार मोठें. अशा माणसानें एखाद्या कलावंताचा परिचय करून देण्याचें मनांत आणलें कीं तें कार्य कसें प्रमाणबद्ध होतें याचें हा लेख म्हणजे प्रत्यक्ष उदाहरण होय . . .

: परिचय लेखक :

के. टी. देशमुख

# गुराख्याचा पोर गॅरीकूपर

*आपल्या जिवंत अभिनयाने ज्याने अख्या जगाला वेड लावले व 'ऑस्कर' पदक देऊन ज्याचा बहुमान करण्यांत आला. पण....दुर्दैवाने तो समारंभाला हजर राहूं शकला नाहीं. कारण........? त्याच आपल्या आवडत्या गॅरी कूपरचा आकर्षक पण रोमहर्षक परिचय लेख....*

**हॉलीवुडचा** अॅकॅडमी अॅवॉर्डस् बहाल करण्याचा समारंभ सालाबादप्रमाणें एप्रिल १९६३ मध्यें शाही थाटामाटांत चालू होता. समोर नामवंत नट नटी, निर्माते, दिग्दर्शक, तंत्रज्ञ आणि प्रमुख निमंत्रितांनीं सारे प्रेक्षागृह भरून गेलें होतें. न्यूजरील आणि टेलिव्हिजनचे कॅमेरे फिरत होते. लाखों चित्ररसिक हा सोहळा घरोघर टेलिव्हिजनवर पहात होते.

मंचकावर, सुप्रसिद्ध नट जेम्स – स्टुअर्टच्या हातांत सुवर्णाचा 'ऑस्कर' देण्यांत आल्यावर त्याचा कंठ भरून आला. डोळ्यांत अश्रू जमा झाले. हातांत धरलेला ऑस्कर शक्य तितका ऊंच करून तो चिरक्या आवाजांत ओरडला, "गॅरीकूपर ! आम्हांस तुझा अभिमान वाटतो !" त्याला पुढें कांहीं बोलवेना. चटकन वळून जेम्स स्टुअर्ट बाजूच्या विंगमध्यें नाहीसा झाला.

दुसऱ्या दिवशीं वर्तमानपत्रांमधून साऱ्या जगास समजलें, कीं, रुपेरी पडद्यावरील त्यांचा लाडका कलावंत गॅरीकूपर कॅन्सरच्या आजारानें पोखरला गेला असून अंथरुणांत खिळून आहे. आपणांस बक्षिस द्यावयांत येणारा हा तिसरा ऑस्कर, जेम्स स्टुअर्ट या आपल्या मित्रानें, आपल्या वतीनें स्वीकारावा, अशी इच्छा त्यानें प्रकट केली होती.

त्याची नायकाची भूमिका असलेलें चित्रपट आवडीनें पहाणारे लाखों चित्ररसिक अमेरिकेंतच नव्हे तर साऱ्या जगभर पसरलेलें होते. मूक चित्रपटांच्या जमान्यांत एक 'एक्स्ट्रा' म्हणून दाखल झालेला गॅरीकूपर, आपले कर्तृत्त्व सतत परिश्रमानें घडवीत एक 'चित्र तारा' म्हणून झळकला. आपल्या भूमिकांचा गाजावाजा न करितां, वडेजाव न करितां, टिमकी न वाजवितां गॅरीकूपर हॉलीवूडच्या प्रथम श्रेणीमधील पहिल्या पांच सहा नटश्रेष्ठांत गणला गेला. ऑस्कर **बक्षिस समारंभाच्या** प्रसंगीं त्याच्या तीव्र स्वरूपाच्या आजाराची बातमी अचानकपणें फुटून जगजाहीर झाली. व्यथित अन्तःकरणानें सहानुभूति व्यक्त करणारीं पत्रे, तारा यावयास सुरवांत झाली. त्यामध्यें परिचित मित्रमंडळी तर होतीच परंतु अपरिचित असे हजारों चित्ररसिक होते. 'काऊ बॉय गॅरीकूपर' हा त्यांचा आवडता चित्रतारा होता.

अमेरिकेचे प्रेसिन्डेट केनेडी साहेबाचा वॉशिंग्टनहून खास ट्रंक कॉल आला. गॅरी कूपरबरोबर फोनवरून त्यांनीं मोठ्या आपुलकीनें बातचीत केली. इंग्लंडची राणी एलिझाबेथ हिचा सहानुभूतीपूर्ण असा एक शुभेच्छा दर्शक असा खास संदेश येऊन दाखल झाला. लोकसत्ता,



अनुक्रमणिका

राजसत्ता आणि नागरिक यांच्या अन्तःकरणांत मानाचें व जिव्हाळ्याचें स्थान निर्माण करणाऱ्या कलावंताचें हें 'उज्वल' असे यश होतें. हॉलिवुडच्या उम्या इतिहासांत या घटना अपूर्व अशा होत्या— हें सारें प्रथमच घडत होतें !

आणि यानंतर एक महिन्यानें गॅरीकूपरचें निधन झालें !

मूक चित्रपटांच्या अमदानीपासून या वेळेंपावेतों त्यानें सुमारें शंभर चित्रपटांत कामें केलीं. त्याच्या गाजलेल्या चित्रपटांचीं नांवें तरी किती सांगावयाचीं ? फॉर हूत दि बेल टोल्स, सॅरा टोगा ट्रंक, फ्लेन्स मन, अन् कॉंकर्ड, फ्रेंडली परस्युएशन, प्राईड ऑफ दी यांकीज्, सार्जंट यॉर्क, व्यू गेस्टे, हायनून, मिस्टर डीडस् गोज टु टाऊन हे चित्रपट संस्मरणीय आहेत. अलीकडे प्रत्येक चित्रपटांत कथानायकाची भूमिका करण्याबद्दल त्याला सुमारें अडीच लाख डॉलर्स मिळत असत. आयुष्यांतील त्याची एकूण कमाई सात आठ कोटी डॉलर्सच्या घरांत जाईल. एव्हढी संपत्ति मिळवितांना त्याने अपार कष्ट आनंदानें सोसले. इटली, मेक्सिको, आफ्रिका या देशांमधून दूरदूरचे आणि अडचणींचें प्रवास, महिनों गणतीचें आऊट डोअर शूटिंग, उन्हातान्हांत तासन् तास कॅमेऱ्या समोर उमें रहाणें, घोड्यांच्या फेंकी, प्राणघातक असे अपघात, लढाया हा सारा प्रचंड दगदगीचा मामला ! परंतु तो केव्हां त्रासलेला, चिडलेला दिसला नाहीं. मेक्सिकोच्या उष्ण अशा वातावरणांत तयार होत असणाऱ्या 'व्हेराक्रूझ' या चित्रपटाच्या वेळीं तापमान एकशेंवीस डीग्रीपर्यंत चढलेलें होतें. नटवर्गामधून उष्म्याबद्दलची कुरबूर एक–दोनदां ऐकूं आल्यावर तो शान्तपणानें म्हणाला, "मी याहूनहि अधिक कष्ट सोसलेलें आहेत. चित्रपट कलाकृति निर्माण करावयाची म्हणजे अनेक अडचणी येत असतात."

त्याची नायकाची भूमिका असलेलें कित्येक बोलपट गाजलें. वेगवेगळ्या धर्तीच्या नायकाच्या भूमिका त्यानें तडफेनें यशस्वी करून दाखविल्या. 'लाईव्हज् ऑफ ए बेंगॉल लान्सर' मध्यें ब्रिटिश घोडदळामधील एक जबाबदार अधिकारी, फ्रँक कॉप्रा या प्रसिद्ध दिग्दर्शकाच्या 'मिस्टर डीडस् गोज टु टाऊन' या चित्रपटामध्यें अपार माणुसकी असलेला सरळमार्गी गांवकरी, 'हायजून' मध्यें कर्तव्यनिष्ठूर असा शेरीफ, 'फॉर हूम दी बेल् टोल्स' या चित्रामध्यें प्रणयप्रधान नायक, 'ॲडव्हेंचर्स ऑफ मार्को पोलो' मधील रगेल आणि रंगेल नायक, अशा त्याच्या कितीतरी भूमिका रसिकांच्या दीर्घकाळ स्मरणांत रहातील. पडद्यावरील त्याचें निवेश समोर नायिका येऊन उभी राहिली कीं, कोसळून पडे. थोडा भांबावलेला, गोंधळलेला, थोडा लज्जित, कधीं ओशाळलेला तर कधीं ओंठांमधून मिस्किल हास्य दर्शविणारा; परंतु त्याच वेळीं 'एक सामर्थ्यशाली पुरुषोत्तम' असा आभास सतत कायम ठेवण्यास गॅरीकूपर अत्यंत कुशल होता. त्यामुळें त्याच्या चित्रपटांत नायक नायिकेच्या मीलनाचा प्रसंग हा एक मोठा बहारीचा मामला म्हणून वाखाणला जाई. पुरुष प्रेक्षक त्याच्या गोंधळलेल्या अवस्थेवर खूप होत तर स्त्री प्रेक्षक त्याचा बुजरा संकोची असा अभिनय पाहून आनंदित



**'नॉर्थ वेस्ट माऊन्टेड पोलिस' या चित्रपटांत मॅडेलिन कॅरोल व गॅरी कूपर**

आकर्षक व्यक्तिमत्व, त्याचा सहजसुन्दर पण वजनदार आणि नाटयपूर्ण अभिनय सहृदय प्रेक्षक कधींहि विसरणार नाहीं.

खाजगी आयुष्यांत त्याची वागणूक नम्र आणि संकोची अशी असल्यानें आपणांस शोभून दिसेल अशी अभिनयाची परिणामकारक परंतु वैशिष्टयपूर्ण अशी लकब त्यानें अभ्यासानें शोधून काढली. भला मोठा ऊंच, सडपातळ, तरतरीत, आत्मविश्वासानें परंतु मंदगतीनें हालचाल करणारा हा कलावंत, आपल्या प्रमुख नायकाच्या भूमिका मोठ्या बेछूट अशा बेपर्वाईनें रंगवीत असे. परंतु त्याचा हा सारा अभिनय होत असत. आपल्याकडे 'ब्रह्मचारी' या चित्रपटांत दिग्दर्शक अभिनेते विनायकांनीं अशाच लाजऱ्या बुजऱ्या नायकाची भूमिका स्वतः रंगवून यशस्वी केली होती. बुजरा नायक आणि धीर परंतु चतुर अशी नायिका ही जोडगोळी प्रेक्षकांच्या अन्तःकरणांत सहानूभूति आणि प्रेम निर्माण करते. हें रसायन लोकप्रिय होत आहे हें हेरल्यानंतर हॉलिवूडनें अनेक श्रेष्ठ नायिकांच्या बरोबर भूमिका योजून गॅरी कूपरचे अनेक चित्रपट 'बॉक्स ऑफीस हिट् !' करून दाखविले ! 'मार्लिन डिट्रिच' बरोबर मोरोक्को, 'हेलेन हेज्' बरोबर फेअरवेल टु

आर्म्स, 'टलुलाइ बँक हेड' बरोबर डेव्हिडल अँन्ड दी डीप, 'मेरिअम हॉप किन्स' बरोबर डिझाईन फॉर लिव्हिंग, 'जीन आर्थर' बरोबर फ्लेन्स मन, 'मर्ल ओबेरॉन' बरोबर काऊ बॉय अँन्ड दी लेडी, 'मॅडेलिन कॅरोल' बरोबर नॉर्थ वेस्ट माऊन्टेड पुलीस, 'इन्ग्रिड बर्गमन्' जेव्हां कीर्तिशिखरावर होती तेव्हां तिच्या बरोबर फॉर हूम दि बेल् टोल्स अशा अनेक चित्रपटांत त्याच्या प्रणयोत्सुक अशा नायकाच्या भूमिका प्रेक्षकांना तर विलोभनीय वाटत, इतकेंच नव्हे तर, नामवंत अशा आणखी कित्येक चित्रपट तारकांना सुद्धां त्याच्याबरोबर चित्रपटांत काम करण्याची संधी मिळावी असा मोह पडे !

गॅरीकूपर वृत्तपत्रप्रतिनिधीजवळ म्हणतो, "चित्रपटांतील प्रणयप्रसंगीं कथालेखकानें लिहून दिलेले संवाद नायकाला पाठ म्हणून दाखवावे लागतात. हे संवाद म्हणत असतांना माझ्या मनाची अशी ठाम समजूत असते कीं, मी नायिकेशीं एकांतांत गप्पागोष्टी करीत आहे. नखरेल वा शालीन अशा लावण्यवतीबरोबर माझें प्रियाराधन चालूं असतांना, जवळ कॅमेरा फिरतो आहे, पांचपंचवीस तंत्रज्ञांचा मेळावा आजूबाजूस उभा आहे ही गोष्ट मी साफ विसरून जातो !" चित्रपटांत त्याचे प्रणय प्रसंग एव्हढे कां रंगत याचें हें इंगित आहे ! टलुलाइ बँकहेड या नांवाजलेल्या नटीनें तर एकदां उघडपणानें बोलून दाखविलें कीं, हॉलीवूडमध्यें कलाकारांची एक मोठी फलटणच आहे. परंतु पौरुषयुक्त असा नायक रंगविण्याचें कसब फक्त जॉन बॅरीमूर आणि गॅरी कपूर या दोन नटवर्यांत आहे !

चित्रपटसृष्टींत 'गॅरी कपूर' या नांवानें गाजलेल्या या कलावंताचें खरें नांव फ्रॅंक जेम्स कूपर. त्याचा जन्म १९०१ सालीं अमेरिकेंतील मॉन्टॅना या डोंगराळ प्रांतांत हेलेना येथें झाला. त्याचे मातापिता ब्रिटिश परंतु अमेरिकेंत येऊन स्थाईक झाले होते. त्याचे वडील चार्ल्स हेन्री कूपर हे स्टेट सुप्रीम कोर्टाचे न्यायाधीश होते. शिक्षणासाठीं म्हणून त्यांनीं गॅरी कूपरची रवानगी बालपणींच इंग्लंडला केली. तेथील सुशिक्षणाचा परिणाम गॅरी कूपरचे आचार विचार शिस्तबद्ध होण्यांत झाला. कपडयांच्या बाबतींत तो नीटनेटका राहूं लागला. त्याच्या तोंडीं इंग्रजी धाटणीची विशिष्ट लकबहि याच वेळीं आली ती पुढें जन्मभर कायम राहिली. त्याचें विश्वविद्यालयीन शिक्षण मात्र अमेरिकेंत झालें. इओआ येथील ग्रिन्नेल कॉलेजमधून तो ग्रॅज्यूएट झाला.

मॉन्टॅना हा मुलूख डोंगराळ आहे. शाळा कॉलेजमधील सुट्टीच्या दिवसांत तो तेथें मनसोक्त हिंडत असे. त्याच्या वडिलांच्या शेतावर व गुरें चारण्याच्या रानावर जाई. अमेरिकेमध्यें गुरांचे मळे मोठे मोठे कळप घोडयावरून सांभाळतात. तेथील गुराखी पोरें घोड्यावर बसण्यांत पट्टीचे निष्णात असतात. गॅरी कूपर अश्वविद्येंत लहानपणीच पारंगत झाला. तुफानी वेगानें घोडा फेंकणें, कुंपणावरून घोडा उडविणें, डोंगराच्या उभ्या चढणीवर किंवा खालीं उतारावर सहज लीलेनें घोडा भरधांव नेणें हा त्याचा नित्याचाच खेळ होऊन बसला. त्याच्या या घोडयाच्या फेंकींमुळें पुढें तो एक 'चित्रतारा' म्हणून चमकला आणि त्याला 'मॉन्टॅना काऊ बॉय' अशी लाडकी पदवी मिळाली.








अनुक्रमणिका

ग्रॅज्यूएट झाल्यानंतर पुढील व्यवसायाच्या दृष्टीनें फिरत असतां तो सहज हॉलिवूडला येऊन पोहोंचला. दैवानें त्याच्यासाठीं येथें फार मोठी अशी कर्तबगारी आणि कीर्ति योजून ठेवली होती !

हॉलिवूडला त्या वेळेस दोन भागांच्या मूक चित्रपटांचा जमाना धूमधडाक्यांत चालूं होता. 'स्लॅपस्टिक कॉमिडीज्' बरोबर चढाओढ करणारा 'वेस्टर्न' म्हणून एक चित्रप्रकार झपाट्यानें विलक्षण लोकप्रिय झाला होता. स्लॅपस्टिक कॉमिडीज् कालांतरानें अस्तंगत झाल्या परंतु हे वेस्टर्न बोलपट आजतागायत रूढ आहेत– लोकप्रिय आहेत. डोंगर दऱ्यांच्या पार्श्वभूमीवर दरवडे, खून, लुटालूटी, जाळपोळी, घोड्यांच्या तुफानी घोडदौडी, शर्यति, पाठलाग अशा प्रकारचा मालमसाला या 'वेस्टर्न' चित्रप्रकारामध्यें पुरेपुर भरलेला असावयाचा. त्यांतील पात्रें शक्तिमान परंतु रांगडी, हेकट किंवा खुनशीं अशीं रंगविलेलीं. नायक हा शूर वीरोदात्त पण बंडखोर दर्शविला जात असून लढण्यांत वा प्रेम करण्यांत तो सारखाच निष्णांत असावयाचा.

अर्थांत अशा कथानकांच्या चित्रीकरणासाठीं घोड्यावर बसण्यांत पटाईत अशा शें-दोनशें 'एक्स्ट्रा' कलाकारांची गरज स्टुडिओला दररोज असावयाचीच. तरुण आणि देखण्या गॅरी कूपरच्या घोडदौडीवर फिदा होऊन ओल्ड फॉक्स स्टुडिओनें त्याला एक्स्ट्रा म्हणून लगेच दाखल करून घेतलें. दिवसास दहा डॉलर्स हा करारहि त्याला आकर्षक वाटला. दिग्दर्शक सांगेल तेव्हां घोडेस्वारांच्या टोळीमधून घोडदौड करीत राहणें एव्हढेंच काय तें काम. व्यवसाय म्हणून कायमचें चित्र सृष्टींत रहावें अशी सुरवातीस त्याची इच्छा नव्हती. परंतु एक दिवस अचानकपणें त्याला समजलें कीं 'वेस्टर्न' मधील 'टॉम मिक्स' नांवाच्या चित्रनायकाला आठवड्याचा पगार म्हणून सतरा हजार पांचशें डॉलर्स मिळतात. एव्हढा मोठा आंकडा ऐकल्यावर आपला भाग्योदय चित्रपट सृष्टींतच करण्याचें त्याच्या महत्त्वाकांक्षी मनानें निश्चित केलें.

त्यानें आपल्या कामांत रस घेण्यास सुरवात केली. ह्याचा परिणाम म्हणूनच कीं काय 'जॉनी वॉटर्स' या दिग्दर्शकानें 'थेल्मा टॉड' या त्या वेळच्या मर्लिन मन्रोबरोबर त्याला नायकाची भूमिका प्रथम 'ॲरिझॉना बाऊन्ड' या चित्रांत दिली.

चित्रीकरणास झपाट्यानें सुरवात झाली. नायक म्हणून गॅरीकूपरचें काम सुरेख वठत होतें. नायक नायिकेच्या प्रणयप्रसंगाच्या चित्रीकरणाचें वेळीं मात्र गंमत झाली. त्या कामिनीचे मादक हावभाव आणि सराईतपणें केलेलें हस्तलाघव पाहून गॅरीकूपर नुसता बावरून आपला उभाच राहिला. चतुर दिग्दर्शकानें कूपरचा वेगळा शॉट स्वतंत्रपणानें घेण्याची योजना केली. कॅमेरा योग्य जागीं हलविला गेला. आतां नायिकेच्या प्रेमभरतीस प्रतिसाद देणारा अभिनय नायकाच्या चेहऱ्यावर कसा काय उमटणार हा प्रश्न होताच. दिग्दर्शकानें तो प्रश्नहि तेवढ्याच चातुर्यानें सोडविला. स्निग्ध अशा आवाजांत त्यानें कूपरशीं बोलायला सुरवात केली. "हें बघ– कूपर, मी आतां कॅमेरा सुरूं करावयास सांगणार आहे. मी तुझ्याशीं जें बोलत राहीन त्याप्रमाणें तुझ्या चेहऱ्यावरील भाव तूं बदलीत चल म्हणजे सारं कांहीं ठीक होईल. तूं अगदीं भुकेला आहेस. दोन दिवस तुझ्या पोटांत अन्न नाहीं— कॅमेरा सुरूं करा — एकाएकीं तुझ्यासमोर खाद्यपदार्थांच्या बशा तुला दिसत आहेत. हें काय ? तुझ्या खास आवडीचें पक्वान्नहि त्यांत दिसतें आहे ! चंगळ आहे अगदीं ! आनंदानें तूं ओंठांवरून जीभ फिरवतो आहेस. हं— आतां ताव मारण्यास सुरवात केलीच पाहिजे ! चल ये पुढें ! आणखीं पुढें.... कट् !"

चित्रपट तयार केल्यानंतर पडद्यावरील गॅरी कूपरचा अभिनय पाहून प्रेक्षकच काय परंतु तो स्वतःच खूप होऊन गेला !

## 'ईमर्जन्सी' काटकसर



"चार रुमालांतून आंत डोकं, घातल्यावर दोन पिना बगलेच्या बाजूनें लावल्या कीं झाला स्वस्त नी मस्त ब्लाऊज !"

अनुक्रमणिका

'लव्ह सीन' हें काय प्रकरण याचा त्याला उलगडा झाला. मनावरील भीतीचें दडपण उतरल्यावर उत्तरोत्तर त्याची अभिनयाच्या दृष्टीनें प्रगति होत गेली परंतु ही आठवण सांगतांना अगदीं रंगांत येऊन गॅरी कूपर म्हणतो, "ते दिवस मूक चित्रपटाचे होते म्हणून माझा जम बसूं शकला. चित्रपट बोलका असता तर त्याच दिवशीं माझी हकालपट्टी झाली असती !"

'वेस्टर्न' मध्यें पडद्यावर दाखविल्या जात त्या लढाया प्रत्यक्षांत सुद्धां फार भयंकर स्वरूपाच्या असत. गॅरीकूपर म्हणतो, "मी सुरवातीस खूपच गांगरून जावयाचा ! शत्रुपक्ष कोणता आणि मित्रपक्ष कोणता हें ध्यानांत धरणें त्या दंगलीमध्यें फार कठीण जाई ! परंतु पुढें पुढें लढाईच्या धुमश्चक्रीची संवय झाली. पटकथेमध्यें माझा पराक्रम लिहिलेला आहे म्हणून नव्हे तर मी माझ्या जिवाच्या भीतीनेंच एकदम तुटून पडून सामना द्यावयास लागलों. याचा फायदा मला दोन तऱ्हेनें मिळे. लढाईत मी माझा जीव वांचवूं शकत असें आणि वीरश्रीयुक्त अशा अभिनयाबद्दल माझी कीर्ति पसरत चालली !"

त्याच्या दुसऱ्या चित्रपटाच्या प्रकाशनापासून, म्हणजे १९२६ सालीं, 'गॅरीकूपर हा चित्रपटसृष्टींत एक 'तारा' म्हणून गणला गेला. या चित्रपटाचें नांव होतें 'विनिंग ऑफ बारबरा वर्थ', निर्माते होते 'सॅम्युअल गोल्डविन', आणि दिग्दर्शक होते 'हेन्री किंग !' रूपसुन्दरी 'क्लरा बो' या चित्रपटाची नायिका होती. हिचें प्रस्थ त्या काळीं फार वडे म्हणून समजलें जात होतें. हा चित्रपट खूप गाजला म्हणून पुन्हां त्याच नटीबरोबर कूपरला प्रमुख नायकाची भूमिका देण्यांत येऊन आणखी एका चित्रपटाची योजना आंखण्यांत येऊन चित्रपट पुरा होत आला. त्याच वेळीं हॉलिवूडमध्यें 'आवाजा' ची किमया प्रकट झाली ! हा तयार झालेला संपूर्ण चित्रपट 'मुका' होता, परंतु नायक नायिकेच्या लग्नप्रसंगीं शेवटीं पाद्र्यानें लग्न कर्तव्य आहे काय अशा प्रश्नाला जी 'होय–आय डू' हीं उत्तरें दिलीं गेलीं, तेवढे दोन दोनच शब्दच ध्वनिमुद्रित करण्यांत येऊन चित्रपट प्रकाशित केला गेला. संपूर्ण मूक अशा या चित्रपटांत प्रेक्षकांना हे चार शब्दच ऐकावयास मिळत, परंतु हा चित्रपट 'बोलका' म्हणून त्याची जाहिरात करण्यांत आली हें विशेष होय !

मुका चित्रपट बोलूं लागला ! पण या किमयेमुळें चित्रसृष्टींत अनेक विलक्षण फेरफार झाले. कालचे 'चित्रतारे' आज पृथ्वीवर पडलेले निःसत्त्व 'उल्का' ठरले ! सुरवातीचीं ध्वनि मुद्रित करण्याचीं यंत्रें आजच्या सारखींच संवेदनाक्षम नसल्यामुळें पात्रांना आपले संवाद 'राणा भीमदेवी थाटांत ओरडून म्हणावे लागत असत. आवाजाची फेंक दमदार होत नाहीं म्हणून शेंकडों कलावंतांना स्टुडिओचा दरवाजा बंद झाला !

> **आपल्याच एकेक पै जमविण्यावर देशाची शस्त्र सामुग्री उभी राहूं शकते. भारताच्या संरक्षण रोख्यांत अधिकाधिक पैसे गुंतवणे आपले कर्तव्य आहे.**

गॅरीकूपरला लहानपणीं शेतावर काम करितांना आपल्या गुराखी मित्रांना किंवा गुरांना लांबून आरोळ्या देण्याची संवय असल्यानें, 'साऊंड टेस्ट'च्या वेळीं हा रांगडा गडी आपले संवाद एव्हढ्या जोरांत म्हणाला कीं, साऊन्ड रेकॉर्डिस्टच्या कानावरील 'हेड फोन' उडून जाण्याची वेळ आली ! गडी एकदम पास झाला. !

आपल्यांतील दोषांची जाणीव ठेवून ते घालविण्याचा व गुणांची जोपासना करण्याचा तो कसोशीनें सतत प्रयत्न करीत असे. म्हणून त्याची अभिनयांत एकसारखी प्रगतीच होत गेली. आपलें चित्रताऱ्याचें आसन त्यानें कधीं ढळूं दिलें नाहीं. कथानायकाची भूमिका, अभिनय आणि अभिनिवेश या सर्व दृष्टीनें 'सर्वोकृष्ट' ठरल्यावद्दल गॅरीकूरला 'सर्वोत्तम अभिनेता' म्हणून पूर्वी दोन वेळां 'सुवर्ण ऑस्कर' मिळण्याचा बहुमान लाभला होता. १९४१ सालीं 'सार्जंट यॉर्क' आणि १९५२ सालीं 'हायनून' या चित्रपटांत त्यानें दाखविलेल्या कलागुणांचा तो 'गौरव" होता. चित्रपटसृष्टींत त्यानें बजावलेल्या एकूण कामगिरीबद्दल म्हणून १९६१ सालीं त्याला एक 'खास ऑस्कर' बहाल करण्यांत आला. तसें म्हटलें तर त्यानें 'वेस्टर्न' पेक्षां सामाजिक विषयावरील चित्रपटांत अनेक भूमिका यशस्वी तऱ्हेनें गाजविल्या परंतु 'काऊ बॉय स्टार' ही पदवी त्याला कायमचीच चिकटली. मॉन्टॅनामधील या गुराख्याच्या पोराची मांड पक्की होती, त्याची घोडदौड सतत तीन तपें चालूं राहिली. आजचा आपला आवडता विनोदी चित्रतारा कॅरी ग्रॅन्ट हा चित्रपटसृष्टीच्या क्षितिजावर उगवूं पहात होता त्यावेळीं, हॉलीवूडनें त्याची जाहिरात करितांना, 'गॅरीकूपरचा नवा अवतार' अशी केली. गॅरीकूपरची ही नक्कल पडद्यावर त्या वेळीं तरी अयशस्वी ठरली गेली. 'आपला आवडता चित्रपट तारा' असा लौकिक आणि लोकप्रियता गॅरीकूपरने अव्याहत छत्तीस वर्षें कायम टिकवून धरलीं ही खचित अनन्यसाधारण अशी कर्तबगारी आहे असें म्हटलें पाहिजे.

गॅरीकूपरचें वैवाहिक जीवन पूर्णतः सुखी आणि आनंदी असें गेलें. त्याच्या प्रिय पत्नीबरोबर– व्हेरोनिकाबरोबर– त्यानें तीस वर्षें सुखानें संसार केला. त्यांची एकुलती एक लाडकी कन्यका 'मेरिआ, ही तर गॅरीकूपरच्या जीविताचें 'सर्वस्व' होती ! दोन चित्रपटांच्या मध्यें जी सुटी मिळे त्यामध्यें हे तिघेहि जण दूर दूरच्या ठिकाणीं जगाच्या प्रवासास जात. 'शिकारीला जाणें' आणि 'मासे पकडणें' हे त्याच्या आवडीचे छंद होते.

हॉलिवूडजवळ 'ब्रेन्टवूड' येथें स्वतःच्या मालकीच्या एका मल्या मोठ्या प्रासादतुल्य अशा बंगल्यांत कूपर कुटुंब रहात असे. पडद्यावर रंगेल आणि रंगेल असें जीवन रंगविणारा हा कलावंत आपल्या खाजगी आयुष्यांत शान्त समाधानी प्रेमळ आणि

अनुक्रमणिका

तृप्त होता ! सायंकाळीं घरीं येणाऱ्या मित्र-मंडळींत प्रामुख्यानें सॅम्युअल गोल्डविन, जेम्स स्टुअर्ट, ऑड्री हेपबर्न, मेल फेरर आणि क्वचित केव्हांतरी विनोदी चित्र तारा डॅनी के यांचा फेरफटका होत राही. आपल्या शेवटच्या कॅन्सरच्या दुखण्यांतून आपण कांहीं आतां उठत नाहीं हें कळल्या-पासून तो आपल्या प्रिय पत्नीला आणि आपल्या लाडक्या लेकीला नेहमीं धीर देत असे, त्याचें सांत्वन करीत असे. आयुष्यभर नायकाच्या भूमिका त्यानें पडद्यावर कणखरपणानें रंगविल्या. मृत्यूशीं सामना देतांना त्यानें तोच बाणेदार कणखरपणा कायम ठेविला. ज्या धैर्यानें त्यानें मृत्यूला कवटाळिलें, तें धैर्य जणूं काय आपणांस दर्शवीत आहे कीं, आपण जीवन जगावें कसें !

गेल्या दोन चार वर्षांत रजतपटावरील अनेक तेजस्वी तारे निखळून पडले. टायरन् पॉवर, एरोल फ्लिन, हंम्फ्रे बोकार्ड, गॅरीकूपर, क्लार्क गॅबल आणि चार्लस् लॉटन् हीं बहुगुणी आणि अष्टपैलु अशीं चित्ररत्नें काळानें हिरावून नेलीं ! त्यांच्या निधनानें रिकाम्या पडलेल्या त्यांच्या आसनांवर, त्यांच्या इतकेंच सामर्थ्यशाली असे कलावंत उभे करण्यास हॉलिवूड आतां असमर्थ आहे, कारण स्वतः हॉलिवूड केव्हांच गतप्राण झालें आहे !

●●●












*....अं हं .... कुणीहि नाहीं. जी चुलीजवळ बसेल तिला की नाही....माझ्याशी लग्न लावावं लागेल.... गुदगुदल्या करणारी गोड कथा ........*



"**गुणाकर,** जातोस ना रे?" गुणाकरची आई स्वयंपाकघरांतून त्याला म्हणाली.

गुणाकर कामांत रंगला होता. कॅनव्हासवर मनासारखे रंग उतरत होते आणि भावनांचं चंदेरी स्वप्न मनासारखं आकारत होतं. त्यामुळं तो स्वतःवरच फारच खूप होता. रमला होता कामांत. हातांतून पॅलेट आणि ब्रश खालीं ठेवणं त्याच्या जिवावर आलं होतं.

"जातोस की नाहीं ?—" पुन्हा आंतून आई ओरडली.



—भी. गो. जांबळे

"कुठं ऽ ऽ ?" गुणाकर सूर ओढून म्हणाला. जत्रेंत घेतलेली पिपाणी मुलं लांब सूर ओढून वाजवतात तसा त्यानं 'कुठं'चा सूर ओढला होता.

"इतक्यांत विसरलास बाबा !" त्याची आई जवळ येऊन उभी राहिली. "अरे, अचला यायचीय ना ?"

"अरेच्या ! विसरलोंच की........"

"विसरलोंच की काय विसरलोंच की ! .... छांदिष्ट !"

—थोडं थांबून, "बघ तें हातांतलं फळकूट आणि ब्रश खालीं ठेवलायस काय तो ?"

"उठतों... उठतों ! जातों...."

"उठतों, उठतों.... विसरलों—आठ दहा वेळां तरी म्हणाला असशील !— ठेव तो ब्रश !"

"हा ठेवला ——"

"ठेवला ! — तं इथंच बस नी ती पोर स्टेशनांत शोधत राहूं दे —"

डोळे वर करून कांहीं विलक्षण पहिल्यासारखं, गुणाकर आईकडं उगाच पाहत राहिला.

"जा उठ बाबा माझ्या !" गुणाकरची आई केविलवाणं म्हणाली. "कित्ती वर्षांनीं येते आहे पोर; मिरज आतां तिच्या ध्यानींहि नसेल !"

"निघालोंच —" आईच्या बोलण्यांतील केविलवाणेपणा त्याला जाणवला. घाईनं उठला.

"गुण्या ! अश्शी बायको मिळायला पाहिजे तुला...."

"कश्शी ? —"

"अस्स कान पिरगाळून चरा चरा वाकवणारी !" त्याच्या आईनं त्याच्या कानाला हात घातला. यावर सायंकाळचं सोनेरी क्षितीज हंसावं तसं ती हंसली. "तुझ्या या छांदिष्टपणापुढं असली—तसली रडकुंडीला यायची !"

"आई ऽऽ —" असं म्हणून गुणाकरानं आपल्या आईच्या दंडांना धरून तिला गदगदा हलविलं, नि "ती विचारी पोर ! — मग तिचे डोळे रडून रडून सुजतील !" गुणाकर खळखळून हंसला. आईला हंसवलं.

स्टेशनांत गाडी आली. थांबली. उतारू उतरूं लागले.

"अचला !"

अचलेनं त्याच्याकडं वळून पाहिलं.

"गुणाकर !"

तो तिच्याजवळ येऊन पोचला.

"कसं ओळखलंस ?" अचला.

"तुझ्या शोधक नजरेवरून." गुणाकर.

"किती किती वर्षांनीं पाहतोंय एकमेकांना ——"

"आतां मोठी झालीयस !"

"तूंहि कांहीं लहान राहिला नाहींस !"

फुलपांखरं खुदखुदलीं.

"—आणि तूं मला कसं ओळखलंस ?" गुणाकर.

"ओळखलं ! !. . . ." अचला

"कां आलीयस ?"

"उगाच !"

"कांहीं तरीच !"

"येऊं नये की काय ?"

"यावं की ! — तरी पण ?"

"कांहींतरीच विचारतोस !"

गुणाकर अचलेला आपली चित्रशाळा दाखवत होता. प्रत्येक चित्राचं रंगून वर्णन करीत होता. मर्म सांगत होता. अचला चकित होऊन डोळे भरून पाहत होती. जिवाचे कान करून ऐकत होती.

"छान–छान ! किती छान काढतोस रे तूं चित्रं ! कशी काढतोस ?"

"कुणास ठाऊक ?"

"कांहीं तरीच !"

"खरंच अचला ! — नंतर मग मलाच वाटतं, मला कसं सुचत जातं ? माझा मीच आश्चर्य करतों —"

"– आणि तें झाकून ठेवलेलं चित्र ?"

"आहे एक ! . . . . अपुरं !"

"बघूं."

"बघायसारखं नाहीं . . . . काय बघायचं त्या अपुऱ्या चित्रांत ?–

"तरीहि बघूं दे — छानच असेल !"

चित्रावरील पडदा दूर होतो.

"अरे, हें तर तुमचं स्वयंपाकघर आहे ! —जस्सच्या तस्सं ! — अर्धवट कां ? पुरं कां नाहीं केलंस ? —"

"किती दिवस झाले. लोटले– पुरंच होत नाहीं तें. – योगच येत नाहीं !"

"म्हणजे ?"

"चित्र पुरं करायला कुणी मिळत नाहीं !"

"म्हणजे ?"

"तें पुरं करायचं झालं तर कुणाला तरी चुलीपुढं त्यासाठीं बसायला हवं ! ! —"

"कुणीहि बसेल की !"

"अं ऽऽ ! तसं नाहीं ! –"

"अं ! मग कसं ?"

"कुणीहि बसेल एवढ्यावर भागणार नाहीं ! प्रश्न आहे तो इथंच आहे !"

"प्रश्न ? — अरे व्वा !"

"हो ऽ ! —— बाईसाहेब ! वाटेल तिला बसतां येणार नाहीं !"

"म्हणजे ?"

"कुणी बसेल तिला किनई माझी बायको व्हावं लागेल,.... माझ्याशीं लग्न करावं लागेल, — आहे माहीत ?" लहान मुलाला समजावून सांगावं तसं गुणाकर म्हणतो.

"अरे व्वा ! . . . . नाहीं तर ?" अचला मोठ्ठाल्ले डोळे करून पाहते.

"नाहीं तर, — तें तियंच घोडीवर — फडकं पांघरून ! –अपुरं ! !"

"विचित्र आहेस झालं !"

"गुणाकर !"

"अं !" गुणाकर नजर वर करत नाहीं.

अचला पाहत राहते.

गुणाकर गुंग असतो. ब्रश चित्रफलकावर फिरत असतो. नर्तकी सारखा नाचत असतो.

अचला मोहित होते.

"गुणाकर, इकडं बघ."

तरीहि त्याची नजर चित्रफलकावरून हालत नाहीं. —

अचला त्याच्या हातांतला ब्रश नाजुकपणे थांबवते.

त्याची नजर वर होते.

"काय ?"

"तें चित्र पुरं कर ! —"

गुणाकर अचलेकडं एकटक वेध घेतल्यासारखं पाहतो.

"कसं होईल ?"

"होईल ! मी बसतें . . . ."

"सोपी नाहीं गोष्ट !"

"आहे माहीत !"

"माझा पण ? —"

"होईल पुरा !"

"खरंच ?"

"हो !"

•••



अनुक्रमणिका

*व्यक्ति तितक्या प्रकृति ....*

***कांहीं 'वरुनि धुवट सोवळीं' कांहीं 'वरि वरि सुरस अंतरीं कुरस' कांहीं 'दाखवि वरपांगीं एक' कांहीं वगलेत सुरी ठेवून असणारीं....अशीं अनेक. त्यांपैकीं कांहीं जण या लेखांत सांपडतील....***




—रसिक मनोहर

**कुणाला** सांगितलं तर खरंसुद्धां वाटायचं नाहीं. गेले चारपांच दिवस माझी झोंप पार उडून गेली आहे. आणि त्याचं कारण म्हणजे पुढील आठवड्यांत येणाऱ्या (ईश्वर कृपेनें) माझ्या एकुलत्या एक मेव्हण्याचा वाढदिवस ! सारी दुनिया एक तरफ और जोरुका भाई एक तरफ अशा ह्या प्राण्याला वाढदिवसानिमित्त कोणतं पुस्तक भेट म्हणून द्यावं व त्यावर काय शुभेच्छा व्यक्त कराव्यांत ह्याच काळजीनं माझी झोंप उडाली आहे.

म्हणजे त्याचं असं झालं कीं दोन तीन वर्षांपूर्वीं आमच्या सासूबाईंनीं आपल्या मुलाचा पंचविसावा वाढदिवस साजरा केला. त्याची गढेपंचविशी कां साजरी करावी हें कांहीं कळलं नाहीं. त्याच्या आधीं कधीं वाढदिवस साजरे केल्याचं आठवत नाहीं. पण त्यावर्षी त्याच्या चारीहि वहिणींनीं फारच आग्रह धरल्यामुळें–स्वत:ला मिरवायला व माहेरीं रहायला कांहींतरी हमखास निमित्त मिळावं म्हणून-ह्या रौप्यमहोत्सव साजरा करण्यांत आला. सकाळीं गोडघोड जेवण व संध्याकाळीं केक कापणें, Happy Birthday to you असं वेगवेगळ्या चालींत व पट्टींत ओरडणं असा कार्यक्रम होऊन पौर्वात्य आणि पाश्चिमात्य संस्कृतीचं भावनात्मक सहजीवन साधण्यांत आलं होतं— जेवणाच्या वेळची उदवत्ती आणि केकमधली मेणवत्ती ही ह्या दोन संस्कृतीची प्रतिकं ! वरकरणीं सोज्वळ वाटणाऱ्या ह्या प्रसंगानें माझ्यावर प्रसंग गुदरवला तो आजतागायत ! मेव्हण्याला विनोदाची आवड ('टवाळा आवडे विनोद' हे संतवचन स्वारीला कसं तंतोतंत लागू पडतं !) म्हणून मी त्याला "मोठे मासे आणि छोटे मासे" हें पुस्तक भेट म्हणून दिलं आणि त्यावर इंप्रेशन मारण्यासाठीं माझ्या मगदुराप्रमाणें लिहिलं–" "प्रिय बाळ, वाढदिवसानिमित्त हार्दिक अभिनंदन. छोट्या नि मोठ्या माशांच्या जगांत, मीन जलावाहेर जसा, असा दारुण अनुभव न येतां तुझं भावी जीवन सुखसमृद्धीचं जावं आणि सारं कसं शांत शांत वाटाव हीच आजच्या प्रसंगीं शुभेच्या... "

सहज गंमत म्हणून केलेल्या ह्या प्रयोगाचं माझ्या सासरीं वारेमाप कौतुक झालं. आपला जांवई अगदींच कांहीं अवलिया नाही ह्यावद्दल सासूबाईना वरंच समाधान वाटलं. आमच्या **सौ.** च्या दूरच्या आत्यावाईनी "बाकी कसलं वळण नसलं तरी अक्षर वरीक वळणदार आहे हो" असा शालजोडींतला अहेर दिला. आमच्या लग्नाच्या वेळीं त्या येऊं न शकल्यामुळें अहेर द्यायचा राहिला होता म्हणे !

दुसऱ्या वाढदिवशीं ह्या मेव्हण्याला 'गवाळ-ग्रंथ' हे पुस्तक भेट म्हणून दिलं. ("माझा ग' वाळ, अगदींच गवाळ–" त्याच्या आईची वाळवोध तक्रार) माझ्यावद्दलच्या सासरी वाढलेल्या अपेक्षा पूर्ण करण्यासाठीं मी वराच विचार करून—लग्न करण्याचा (अ) विचार करतांना सुद्धां मी एवढा विचार केला नव्हता— लिहिलं— "तुझ्या भावी आयुष्याचा ग्रंथ सुरस नि रम्य व्हावा हीच शुभेच्छा..." (ह्या उपद्व्यापी प्राण्याचा ग्रंथ लवकर आटोपला तर वरा ही समस्त चाळकऱ्यांची भावना. "फक्त चांगल्या माणसांनाच उचलायचं असा त्या मेल्या यमाचा नियमच मुळीं ! आणि असले काळ रहातात मागें आमचा जीव खायला..." मास्तरीण सुंद्रावाईची नित्याची परवचा.)

पुढं सालावादप्रमाणें येणाऱ्या प्रत्येक वाढदिवशीं मी असेच अहेर करूं लागलों." "पुढल्या वर्षी लवकर या" असं न विनवतांच त्याचे वाढदिवस वाजवीपेक्षां लवकर येत आसावेत असं मला उगीचच वाटायचं.

प्रतिवर्षी प्रारंभी त्याचं नांव व खालीं आमची नांवं— सुरवातीला सहकुटुंब व पुढें पुढें वाढता सहपरिवार—एवढाच काय तो ठराविक मजकूर, वाकीचा मला नित्य नव्यानें सुचवावा लागे.

माझ्या होणाऱ्या कौतुकामुळें माझ्या सौ. च्या अंगावर गूठभर मांस चढत असे. (ते न चढतं तर तिच्याच फायद्याचं होतं ! ) परिणामीं सासरची इतर मंडळी आणि माझी मित्र मंडळी त्यांच्याहि वावतींत मला हीच पद्धत अंमलांत आणावी लागली. दरवेळीं कांहींतरी मजेशीर लिहावं ह्या नादापायीं मी भलभलते प्रसंग ओढवून घेतले माझ्यावर ! माझं एक मन सांगे "हा नाद सोड सोड"

तर दुसरं मन वजावी, "कुठलाहि नाद सोडण्याचा एकच क्षण असतो, आणि तो म्हणजे त्याच्या नादीं लागण्यापूर्वीचा..." दोन मनाच्या कचाटयांत सांपडल्यामुळें मी मात्र दोम वायकांच्या दादल्यासारखा अगतिक झालों होतो.

माझ्या भाचीच्या वाढदिवशीं माझ्या गद्य मजकूराला, शाळेंत असतांना जॉमेट्रीच्या साठे मास्तरांनीं आमच्या हस्तलिखित "भरारी" साठीं केलेल्या कवितेची जोड दिली. जॉमेट्रीच्या मास्टरांनीं पोएट्रीच्या वाटेला जाणं जरा चमत्कारिकच ! पण मुळांत प्रेमाचा त्रिकोण नसलेलं "शाकुंतल" गडकऱ्यांनीं समद्विभुज त्रिकोणांत वसवलेलं आहेच कीं ! कवि भूमितीशीं लगट करतो तर ह्याच प्रमेयाची विरुद्ध वाजू भूमितीच्या मास्तरांनीं काव्यांचं गणित सोडवून कां सिद्ध करूं नये, असा विचार असावा त्यांचा. नाहींतरी साठेमास्तरांचं सारंच विचित्र होतं. शिकवतांना "यु फालो दॅट्?"चा उच्चार चक्क "यु फालुदा ?" असं करायचे. त्यांचं काव्य वाचून माझा अक्षरशः फालुदा झाला होता. तीच कविता मी "राजकन्येची सांवली हरवली" ह्या पुस्तकावर लिहून संदेश पुरा केला. "प्रिय निमा, वाढदिवसा-निमित्त हार्दिक अभिनंदन. राजकन्येची सांवली हरवली, ती सांपडली. तसाच तुझा हरवलेला अभ्यास सांपडावा ही सदिच्छा आजच्या प्रसंगी तुझ्यासाठीं नवीन प्रार्थना—

'सदा सर्वदा लोभ तुझा असूं दे,
तुझिया कृपेनें यश ते मिळूं दे
उपेक्षुं नको गुणवंते अनंते,
सखे शारदे मागणें हेंचि तूंते...'

पुस्तकावरचं काव्य माझंच आहे असं वाटून (ते नवकाव्य नसतांनाहि) माझ्या सासरच्या मंडळीनीं हाय खाल्ली. कविता करणारा माणूस कामांतून गेला अशा दृढ समजूतीमुळें त्यांनीं माझ्यांत कविना वापजन्मीं ही कल्पना करतां येणार नाही अशा अनेक विकृतींचा शोध लावून 'जें न देखें रवि, तें देखे कवि' ही उक्ति खोटी ठरवली." मीने, असं कसं ग झालं ? अग, तुझा नवरा वेडा कीं ग झाला ?..." असा करुण हंबरडा सौ. च्या मात्रशीनं फोडला होता. ह्या साऱ्यांना जीव तोडून ओरडून सांगावसं वाटलं "वापहो, हे काव्य मी प्रसवलेलं नाही. यु फालुदा ?"

बऱ्याच वेळां अभिनंदनाचा विषय झालेल्या व्यक्तिनींच मला गोत्यांत आणलं पोलिस अधिकारी श्री. गावडे ह्यांच्या एकषष्टी समारंभांत मी त्यांना "पांडरे केंस, हिरवीं मनें" हें पुस्तक भेट देऊन वर झोकांत लिहिलं—" दरवर्षी वयांतीत होण्यापेक्षां वयांत यायचं हीच आपली वृत्ती. म्हणूनच रुक्ष अशा पोलिस खात्यांत अधि-काऱ्याच्या जागीं सेवा करून सुद्धां जीवनां-तील आनंद आपण रसिकपणें, मनमुराद उपभोगं शकलांत. (हा आनंद फुकट फौजदारी उपभोगण्यास पोलिस खात्या-सारखी दुसरी नोकरी नाहीं हें मला फार उशीरां समजलं !) भावी आयुष्यांत आपल्या चिरतरुण हिरव्या मनाला अधिक रसिलेपणा यावा हीच शुभकामना.." ह्या अधिकाऱ्यानें आपली 'कामनापूर्ती' करण्यासाठीं, (माझी शुभकामना वेठीला धरून !) "अभी तो मैं जवान हूं" आणि आपण "म्हातारा इतुका न"—हें सिद्ध करण्यासाठीं अवघ्या तीन महिन्यांत आपल्या स्वैंपाकिणीशीं सुत जमवून आपल्या 'हिरव्या मनाची' साक्ष आम्हांला पटवली होती. आणि आतां ह्या वयांत आपलं कसं होणार ह्या काळजीनें त्यांच्या पत्नीचें केंस पांडरे होतील ही मी धीर सोडून वरलेली वास्तो. पण ती माऊली धीराची खरी. होती ती वाई अशा कानास आल्यामुळें, ह्या दिवसांत दुसरी स्वैंपाकीणवाई कुठून मिळवायची हीच तिला वास्ती पडली होती !

माझ्या आईचं आणि वायकोचं अद्याप-पर्यंत एकमत झालं ते एकाच गोष्टीबद्दल-शिष्टाचार म्हणून कसे ते मला पळतांच येत नाहीत. शिष्ट आणि अशिष्ट ह्यांतला फरक फक्त शिष्टांनाच समजतो अशी माझी कल्पना. असा मी अशिष्ट चाळींत शिष्ट म्हणून गणलों गेलों तो ह्याच फंदा-पायीं ! अण्णा दुर्व्यांचा वत्रन यंदा शालान्त परिक्षेला वसला होता. पहिल्या दहांत येऊन किमानपक्षी शंकरशेठ स्कॉलरशिप तरी मिळेल ही त्यांच्या घरची मर्दानी खात्री व झनानी जाहिरात. निकालाच्या दिवशीं आमच्या अभिनव पद्धतीच्या शुभेच्छा त्याला सर्वप्रथम मिळाव्यांत ह्या सौ. च्या हट्टापायीं मी निकालापूर्वींच "वेडयांचा वाजार" ह्या पुस्तकावर लिहून ठेवलं— "प्रिय वत्रन, शालान्त परिक्षेंतील तुझ्या स्पृहणीय यशाची आम्हांला वाटणारी अपूर्वाई कांहीं वेगळीच, त्याबद्दल सकौतुक हार्दिक अभिनंदन 'गुडीपाडवा आज तुझ्या



"पण, मी एक विचारूं का ...? तुम्ही हें केंस कुठें कुरळे करून घेतां ?"

ह्या यशोजीवनाचा, वर्षोवर्षी असाच उगवो चढत्या मानाचा' ही परमेश्वरचरणीं प्रार्थना.." शालांत परिक्षेत पासाचे नापास वगैरे विद्यार्थ्यांचे निकाल लावणारे प्रकार घडत असल्याकारणानें बबनचं (कसलंहि) यश आम्हांला "स्पृहणीय" वाटतं व त्याबद्दल "आम्हांला वाटणारी अपूर्वाई कांहीं वेगळीच" अशी सांवधगिरीची मुत्सद्देगिरी मी दाखविली होती. आणि वरतीं गड-कऱ्यांनीं चिंतामणराव देशमुखांचं अभिनंदन करण्यासाठीं लिहिलेल्या खास काव्य-पंक्तींचं पलिस्तर मारलं होतं. बबन जेमतेम पास होऊन शाळेंत सुद्धां पहिल्या दहांत येऊं शकला नाही. ("एका मार्कानें शंकर-शेठ हुकली" ह्या त्याच्या घरच्या कौतुकाचा "नशीब समजा, एका नंबरानें नापास झाला नाही—" असा नतद्रष्ट शेजाऱ्यांनीं निकाल लावला) अशा परिस्थितींत माझ्या सुभेच्छा म्हणजे चोंबडेपणानें केलेला शिष्टपणा अशी अण्णासाहेबांनीं समजूत करून घेतली व ती इतर चाळकऱ्यांत शिष्टसंमत झाली. तेव्हांपासून त्यांच्याकडचं वालाचं भिरडं आणि आमच्याकडचं कोलंबीचं लोणचं असा चालू असलेला खुला व्यापार तडकाफडकीं बंद झाला.

कधींकधीं हें अभिर्ष्टचिंतन माझं अनिष्ट करून जातं! आमचे लाळघोटे, लुब्रे श्री. अण्णेगिरी 'पंत मेले, राव चढले' ह्या कोष्टकानुसार हेडक्लार्क झाले तेव्हां मी त्यांना "नस्ती उठाठेव" हें पुस्तक सादर भेट केलं. त्यावरचं माझं ड्राफ्टिंग असं होतं— "श्री. अण्णेगिरी यांस बढतीबद्दल हार्दिक अभिनंदन. उत्तरोत्तर आपणांस असंच सुयश मिळावं हीच सदिच्छा. आजच्या प्रसंगीं हें पुस्तक आपणांला सादर भेट करण्याची माझी ही उठाठेव तरी रास्त ठरावी एवढीच अपेक्षा..." अत्यंत सालस नि निरुपद्रवी असा मजकूर पाहून माझं कौतुक करण्याऐवजीं "माझी उठाठेव रास्त ठरावी" ह्याचा being given to undersand.

'मला प्रमोशन द्या असा करून व हें पुस्तक म्हणजे with reference there to दिलेली लांच आहे अशी समजूत करून त्यांनी माझ्यावर दांत धरला व माझ्या इन्क्रिमेंट स्केलशीं नस्त्या उठाठेवी केल्या! ऑफि-सांतील रजेचें अर्ज खुनशीपणानें नामंजूर करणारे श्री. अण्णेगिरी माझ्या पगारवाढी-विषयक अर्जांना सहजासहजीं रजा देऊं लागले.

माझे ग्रहयोगच असे विचित्र आहेत कीं, इतरांचे माझ्याबद्दलचे ग्रह चांगले होण्याचा योग क्वचित्. वास्तविक "हार्दिक" ह्या सदराखालीं येणारा बराचसा मजकूर बौद्धिक असतो– शिष्टाचार पाळण्यासाठीं, वैयक्तिक संबंध राखण्यासाठीं लिहिलेला! खरा नसला तरी बव्हंशी बरा असतो– लोकांनाही बरं वाटावं व आपणही थोडा भाव खावा ह्या धोरणाचा. इतकं करून सुद्धां सध्यांच्या भेसळीच्या आणि भाववाढीच्या दिवसांत, अंतरिचे खरे भाव लपवून दिखाऊ गोंडस मालाच्या चोख पुरवठ्यानें भाव वाढत नाहीं तो फक्त माझाच!

**देशावरचें संकट अजून टळलेलें नाही. यासाठीं आपल्या निर्धाराची, आत्मबलाची देशाला आज अत्यंत गरज आहे...!**

माझ्या मनचं खरं हितगुज सांगूनहि फायदा नसतो कारण ते इतरांच्या मनाला न मानवण्याची व माझं अहित करण्याची शक्यताच अधिक. असली मालाच्या नांवानें एरव्हीं कितीही हांकाटी असली तरी, अभिर्ष्टचिंतनाच्या बाबतींत अस्सल मालाला नांवं ठेवून, नकली मालाच्या हांकेला 'ओ' द्यायची रीत आहे. कारण इथं मागणी असते ती वेगळी वेष्टनांतील औपचारिकपणाला! म्हणून अशा प्रसंगीं हृदयापासून अर्धा हात दूर असणाऱ्या मस्तकाचा उपयोग करून, हृदयांतील विकारांना संबंधित व्यक्तींपासून मी कटाक्षानें चार हात दूर ठेवतों. माझ्या साध्यासोध्या, प्रसंगीं खट्याळ, विकारांनीं इतरांचा मस्तकशूळ उठून मला नसता हृद्रोग लागूं नये म्हणून हा हृदयीं वरलेला बोध!

असले बोध मानवत नव्हते ते नाना रेडकरांना. स्वतःच्या पैशाला जीवापलिकडे जपून, दुसऱ्यांच्या जीवावर मजा कशी मारायची हे फक्त तेच जाणे! फुकटची बापाची दौलत उपभोगाशिवाय ह्यांनीं फुकट घालविली. आयुष्य जगले ते कसलीच दयामाया न दाखवतां चाळकऱ्यांच्या दयेवर आणि (विशेष करून) 'माये' वर! "फुक-टचा माजलाय् पहा रेडा–" अशीं चाळींत कुचेष्टा जोडली तरी चमडी देईन पण दमडी नाही ह्या वृत्तीनें एवढी माया जोडली कीं, चाळकऱ्यांनाही ह्या अनर्थांत अर्थ दिसूं लागला आणि असूयेनं वाटूं लागलं-" फुकट, फुकट हा आमचा जन्म!" नानांची जिरविण्यासाठीं मी एक निमंत्रणपत्रिका बरेच दिवस मनांत योजून ठेवली होती–

॥श्री फुकटेश्वर प्रसन्न॥

दिनांक एक एप्रिल रोजीं आम्ही भोजनाचा कार्यक्रम आयोजित केला आहे. कार्य सिद्धीस नेण्यास आम्ही समर्थ आहोंत. आपल्या सहकार्यानें कार्यास विशेष शोभा येणार आहे. तरी आपण अवश्य उपस्थित राहून आम्हांस उपकृत करावें ही विनंती. वेळ: रात्रौ ९ वाजतां

स्थळ: आपणांस शोधून काढण्याची मुळींच तसदी पडूं नये म्हणून आपलंच घर!

(कृपया नाही म्हणूं नये).

ही पत्रिकाहि 'नॉट पेड' पोस्टानें पाठवा-यची असा बेत होता. पण पत्रिका पोंचतांच मोड नाही ह्या सबबीखालीं नाना मलाच पदरमोड करायला लावतील व असल्या आगाऊपणाबद्दल घरच्या वडील मंडळींकडून "बोला" चीच मेजवानी देतील ह्या खात्री-मुळें मी तो बेत कटाप केला.

आमच्या चाळींतील सौंदर्यसम्राज्ञी सुमति वेलींग! "मी कुमार, तीहि कुमारी असतांना जागीं एका" प्रेमाशिवाय दुसरं (कांहींच्या) कांहीं न करतां "प्रिय झालों एकमेकां!" पण तिच्या बंधूंना आमचे संबंध नापसंत झाल्यामुळें त्यांनीं तिचा शरीरसंबंध इतरत्र जुळविला. "हे बंधु नव्हत मम वैरी खरे" असं सुमाऐवजीं मीच

म्हणत होतो. ती विचारी दिल्या घरीं सुखी रहारला राजी होती. तिच्या लग्नाच्या वेळीं मी तिला "नांदा सौख्यभरें, शोभो कुल तव सत्कुमरें–" अशी माझी बौद्धिक भावना जाहिरपणें अर्पण केली. वास्तविक सारा दुःखावेग आवरून मला एवढंच सांगायचं होतं—

"मानिली आपुली तुजसि मी एकदां.... वंचिले त्वां जरी हितचि तव वांछितो, वरूनि सन्मार्ग तो धरि सदा सुमतितें !" 'धरि सहा सुमतितें!' असं म्हणतांना मला भडभडून आलें व रामदासांसारखीं 'अचपल मन माझें नावरें आवरितां' अशी स्थिती झाली. आणि 'सावधान' म्हणतांच आपलं अवधान आणि अवसान सांभाळून धूम ठोकणाऱ्या रामदासांचं केवढं कौतुक वाटलं ! कुठें ते मनाचे श्लोक लिहिणारे आणि कुठें आम्ही (ऐदी) मनाचे पोक पुरविणारे ! म्हणूनच तर करुणाष्टकें लिहिण्याऐवजीं मी सुमाला चक्क मंगलाष्टकें अर्पण केली व आपल्या विवाहानें माझं अमंगल करणाऱ्या सुमाला 'कुर्यात सदा मंगलम्' असा संदेश दिला !

उंबरठ्यावर ठेवलेलं माप पायानें उलथून सुमा संसारांत रमली आणि मला मात्र प्रीतीच्या उंबरठ्यावरच पायाला ठेंच लागून, पदरीं कसलंच माप पडलं नाही म्हणून "नको नको मला हा जीव, विष तरी पाजीव" असं वाटूं लागलं. ह्या धक्क्यांतून मला सांवरली ती वावी नाडकर्णीनें ! शेजारीच जागा रिकामी झाल्यामुळें "प्रीती मिळेल कांहो शेजारी" म्हणून तिनं अर्ज केला. प्रेमांत "गांजलेल्या" मला तिनें "आपुलें" म्हणण्याचा प्रेमळपणा दाखविल्यामुळें मी "प्रेम तेयेंचि जाणलें." थोडयाच दिवसांत "तूं माझी अन् तुझा मीच ही खातर" पटूं लागली होती परंतु "प्रीतीची ही हुल फुकट" ठरली ती ह्याच माझ्या विलक्षण हव्यासामुळें ! सध्यांच्या निरस व वेचव जीवनांत (कारणांसाठीं जिज्ञासूंनीं कथा, काव्य नि नाट्य ह्या प्रांतातील "नव" ची आवश्यकता सांगणारी मूलग्राही, तात्त्विक इ. इ. उपपत्ति वाचावी– 'कळत' वा 'नकळत'!) नूतनवर्षाभिनंदना-निमित्त पाठविण्यास योग्य असं कार्ड मी तयार केलं होतं. चित्रांत मिरी व मीठ ह्यांच्या उलट्या वाटल्या दाखवल्या होत्या. त्यांतून ठिबकणाऱ्या कणांकणांतून "नूतन वर्षाभिनंदन" ही अक्षरें तयार झाली होती. असं हे अफलातून कार्ड मी मोठ्या उमेदीनं, उत्साहानं वावीला पाठवलं. मिरी व मीठाच्या वाटलीचं प्रतिक म्हणजे आपल्या स्वैंपाकांतील एकंदर प्रगतीवर टीका असा तिनं अर्थ घेतला—त्याचा संदर्भ मला तिनें एकदां दिलेल्या अळणी व वेचव वटाटेपोह्याशीं जोडला ! वास्तविक माझ्या 'पाक' भावनेंचा तिनं पाककलेंतील आपल्या कौशल्याशीं कां संबंध जोडावा हे कांहीं कळलं नाही. कांहीं स्त्रियां कोणत्याहि विषयावर वाद घालतात, तर कांहींना विषयच लागत नाहीं. वाद विषयक वावींबद्दल वावींच धोरण नेंहमीच उदार असे. कोणत्याहि वावीवर ती वाद घाली. तिच्या ह्या वाद 'ग्रस्त' प्रेमानें









मला हवाहवासा वाटणाऱ्या प्रेमसंबंधांतील हवाच काढून टाकली.

सैन्य पोटावर जगतं तसंच प्रेमहि. उपाशीं पोटी प्रेम जमत नाही आणि जमलंच तर पुढें अनेक पोटांचा प्रश्न उभा रहाण्याचा धोका असतोच ! छोकरीच्या बाक्तींत कुचकामी ठरलेल्या हार्दिक भावनांना नोकरींत मी बुडींत खात्यांत टाकलं- माझं पोट सांभाळण्यासाठीं व नोकरी सलामत तर छोकरी पचास ह्या जाणिवेनं ! परवांचीच गोष्ट. आमच्या कद्रू अण्णे-गिरींना मर्फीसाहेबांनीं सर्वांसमोर जामला (नक्की काय बोलला ते कळलं नाही–पण एकंदर आविर्भावावरून जामला एवढंच कळलं) त्यावेळीं मला सुचलेली हार्दिक भावना– "Many Happy Relious of the Day" –ईश्वर करें यह शुभ दिन वार वार आयें' (हिन्दी भाषान्तर टेलीफोन डिरेक्टरीच्या सौजन्यानें), पण त्यांच्या बाबतींत कसलीच उठाठेव करायची नाही ह्या शहाणपणामुळें न पाठवलेली !

कपाळावर भस्माचे उभे तीन पट्टे ओढणारा "तीन शिंगाचा बैल" अय्यंगार म्हणजे फुकटचा पगार खाणारा 'बिन श्रमाचा बैल' ! वरच्या साहेबांकडे हेरगिरी करणं एवढंच ह्याचं काम. वरचा साहेबहि स्वप्रांतीय–कपाळावर भस्माचे आडवे पट्टे ओढणारा ! "येन्न समाचारम्" असं आडव्या पट्यानं विचारतांच, संजय उवाच ह्या थाटांत ह्या वेटचानें आपला तोंडचा पट्टा चालवायचा. बसल्या बैठकींत ऑफिसच्या राजकारणाचे उभे आडवे धागे विणले जात. मग त्यांत कोणाचं भस्म होईल त्याचा नेम नसे. अशा ह्या प्राण्याला बढती न मिळती तरच नवल. त्याबद्दल त्याचं मी औपचारिक अभिनंदन केलं असलं तरी माझी हार्दिक भावना वेगळीच होती. कपाळावर तीन शिंग, सूट बूट टाय असा वेष, डोक्यावर टोपी, त्यांतून डोकावणारी शेंडी असं त्याचं (व्यंग) चित्र व त्याखालीं "हराम आराम है" हे शीर्षक ! व "जठरानल शमवाया नीचा कां न मक्षिसी गोमय ताजें ?" असा जहाल सवाल, त्याला मराठीचा गंधही नसल्यामुळें बिनधोकपणें लिहिलेला. अशा रितीनें त्याचा" एवन्न समाचारम्" घेण्याचा माझा विचार, असाच सांभारम् मध्यें इडली विरघळावी तसा कुठल्या कुठें विरघळून गेला होता !

शिस्त व भिस्त ह्यांची लागवड करण्यासाठीं आमच्या तोंडचं पाणी पळवून अट्टाहासानें अप्रियतेची रोपं लावणाऱ्या हार्डस्टाफ साहेबाचा निरोपाचा "शेवटचा दिस गोड" झाला तो आम्हांला ! कंपनीच्या औषधांचा खप वाढविण्याच्या नादांत, औषधासारखा कडवट चेहरा करून सर्वांना धारेवर धरून, औषधापुरतीही शांती व विश्रांती न देणारा हा सेल्स डायरेक्टर रिटायर झाला आणि साऱ्यांनीं सुटकेचा श्वास सोडला ! निरोपाच्या वेळीं साऱ्यांनीं मनांत नसतांना सुद्धां त्याला दीर्घ आयुष्य नि आरोग्य चिंतिलं. माझ्या मनांत (येऊ नये तो) विचार आला. एक चित्र काढावं. साहेबाच्या हातापायाच्या मुसक्या बांधून त्याची गठडी बनवली आहे. सदा भुंकणारं त्याचं तोंड स्टिकिंग प्लॅस्टरनें सिलबंद केलं आहे. त्याला एका बरणींत बंद केला आहे. बरणीवर Boss without care ही सूचना. चित्राच्या खालीं To our loving boss on his retirement. We will miss you. (but we'd rather have it that way) हा निरोपाचा संदेश. कंपनीतून मलाच निरोप मिळेल ह्या धास्तीनें न पाठविलेला !

नोकरींत "पोटापुरतं देई, लई नाही लई नाही मागणार–" ही चाल चालत नाही–आमच्या (कसल्याहि) मागण्या आम्हांला (कशाहि) मिळाल्याच पाहिजेत (डर्बी साहेबांशी बातचीत इंग्रजीत होत असे म्हणून, नाहीतर त्यांनीं ह्या 'च' ची आवश्यकता विचारली असती !) ही काळ्या दगडावरची रेघ आहे अशी बेफाट बोल आणि अफाट आलापीची चिजच चिज करण्याची शक्यता अधिक ! पण "पांढऱ्या दगडा"समोर रेघेसारख्या सरळ मागण्या नागमोडी ठरून वाटाघाटी मोडतात. मग युनियन "गली गली में शोर है, डर्बी साहेब चोर है" "हमारी माँग लेते लेंगे" वगैरे घोषणा, दुसरं कांहींच करण्यासारखं नसल्यामुळें, सुरूं करते. खरं तर आमची माँग त्या मांगाला कधींच समजत नाही. क्रौंचवध पाहून वाल्मिकीला काव्य स्फुरलं, तसंच डर्बीसाहेबांचा जुलमी अत्याचार पाहून (मु) कुंदा पोंक्षेला सुचलेलं (किंचित) काव्यहि असंच जहाल होतं—" मज गमे ऐसा बॉस तो- मांग साला–" वापरून वापरून पार झिजून गेलेल्या घोषणांत आमचा संताप कधींच व्यक्त झाला नाहीं. वाटायचं वाटाघाटींत नसता राळ उठवून आमचा अंत पहाणाऱ्या डर्बी साहेबाला एकदम अंतराळांतच पाठवावा. मी एक चित्र तयार केलं होतं. डर्बीसाहेब रॉकेटच्या एका टोंकावर आहे. युनियनचे सेक्रेटरी मोठ्या उन्मादांत रॉकेट उडवून द्यायच्या बेतांत आहेत. आणि टिवल्याबावल्या करीत ओरडत आहे– "Blast off !" मनांत संताप येण्याचा अवकाश कीं, डर्बी साहेबाला व त्याबरोबरच आमच्या संतापाला अवकाशांत पाठविण्याची केवढी नामी कल्पना, पण प्रत्यक्षांत न उतरलेली !

सगळं करून सवरून वरतीं कोडगेपणानें तो मी नव्हेच असं साऱ्या जगाला ओरडून सांगणारी माणसं अंवतीभंवती विपुल असतांना, मी मात्र माझ्या प्रामाणिक हार्दिक भावना, भयानक परिणामाच्या नुसत्या कल्पनेनं माझ्या उराशींच घट्ट कवटाळून " अंतरिंचा भाव एक, दाखवि वरपांगी एक" ह्या वृत्तीनें वागत असतो. ह्याचं एकमेव कारण म्हणजे, तो मी नव्हेच असं सांगण्याची पाळी येण्यपेक्षां, त्यांतला मी नव्हेच अशी जगाची खात्री पटविण्यासाठीं माझी चाललेलीं केविलवाणी धडपड !

* * *



अनुक्रमणिका




# एक सेव्हिंग्ज बँक अकाउन्ट उघडा




## नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज

नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेजमध्ये सेव्हिंग्ज बँक अकाउन्ट उघडणें अत्यंत सोपे आहे. फक्त ५ रु. इतक्या लहानशा रकमेची जरूर आहे व तुम्हांला वर्षाला ३% व्याज मिळतें.

तुमच्या जवळपास असलेल्या आमच्या स्थानिक शाखेस आजच भेट द्या व पूर्ण माहिती विचारा. तुमचा कोणत्याहि स्वरूपाचा बँकिंगचा प्रश्न असो, येथें कार्यक्षमता व कार्यतत्परता तुमच्या सेवेस हजर आहे.



## नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज बँक लिमिटेड

संयुक्त राज्यांत संस्थापित ● सभासदांची जबाबदारी मर्यादित

NGB/59 8 MAR

**मुंबईतील शाखा** :—९०, महात्मा गांधी रोड ; २७०/२७२, डॉ. दादाभाई नवरोजी रोड, (लॉइड्स ब्रँच) ; मिंट रोड, (मिंट रोड आणि सर फिरोजशहा महेता रोडच्या कोपऱ्यावर) ; २१/२९, प्रिन्सेस स्ट्रीट, (लॉइड्स ब्रँच) ; ११७-११९, काझि सैयद स्ट्रीट, मांडवी ; ६५एफ, लिंकिंग रोड, सान्ता क्रुझ ; २/५७१, गोआलिआ टॅन्क रोड, कम्बाला हिल ; शिवाजी मंदिर, न. चि. केळकर रोड, दादर ; २४बि, क्लब रोड, भायकळा. ठाणें :—आग्रा रोड, कोलवाद रोड, (कॅसल मिल्सच्या जवळ).








अनुक्रमणिका

*तिच्या डोळ्यांतला स्वप्नाळूपणा विटला होता. बोलण्यांत फक्त अस्तित्वाचा भास होता. एरव्ही ती अशी झोपलेली असती तर........हळूंच तिचे केस कुरवाळले असते....तिचा चेहरा ओंजळींत घेतला असता....पण........*

—**डॉक्टरांनी** गाडी स्टार्ट केली. गाडीची चाकं रटरटची पुटपुट करत निघून गली. मी फाटकापाशीं थांबलो. असा दिवस माझ्याकडं नेहमीं यावयाचा, तेच शब्द उलटून पालटून बोलायला लावायचा! तोच डॉक्टर, तोच पेशंट....तीच कोरडी ओली आपुलकी.... अन् तेच गुळगुळींत झिजवट शब्द....!

मी आंत आलो. गप्प वसून राहिलो. कमाच्या कॉटपाशीं बसावं वाटलं, पण बसल्या जागेपासून उठवेना. तिचा तो थंड पडलेला चेहरा मघूनच जागा व्हायचा अन् काळजीच्या नजरेनं चौफेर पहावयाचा, कीं उगाचच तिची कींव यायची. तितकाच तिटकारा-सुद्धां! आज मला तिच्याजवळ जावसं वाटेना—उगाचच वाटलं—सारे औषधाचे डोस वेसीनमध्यें ओतून द्यावेत. ताप मांडून ठेवलेल्या कागदाला ओरबाडून फाडून टाकावं—नाहींतर पेन घेऊन त्या कागदा-वर लहान पोरासारखीं खाडाखोड करावी. तिच्या चेहऱ्याकडं न पहातां कुठंतरी दूर निघून जावं.

फोननं मला जागं केलं.

"हॅलो...कोण वोलतंय् ?" त्रासिकतेनें मी फोन घेतला.

"मी केशव—!" माझा मेहुणा.

"काय काम आहे ?" थोडं नरमाईनं वोललो.

"ताईची तव्वेत कशी आहे? रात्रीं झोंप आली नाहीं हो! बेचैन वाटलं! कांहींतरीच स्वप्न पडलं!" भावाच्या प्रेमानं तो वोलला.

"काय ?" उत्सुकतेनें मी विचारलं.

"ताई गेल्याचं—!"

"काय वाईट झालं असतं!" मीच वोलून गेलो.

त्यानं फोन वंद केला. पुन्हा माझं चुकलं—शब्द निघून गेले. चुटपूट लागून राहिली. वाटलं पुन्हां फोन करून क्षमा मागावी, पण हेकट मन गप्प वसलं. वाटलं कुठंतरी डोकं जोरांत आप-टावं—अगदीं जोरांत! पुन्हा या डोक्यानं कसलाच विचार करूं नये म्हणून एकदाच अविचार करावा....!



ती शांत पडून होती. आरामखुर्ची मी कॉटपाशीं ओढून घेतली. सिगारेट शिलगावत मी तिच्याकडं पाहिलं. अजारीपणांत तिच्या शरीराचा डौल विस्कटला होता...बांधा विरला होता... डोळ्यांतला स्वप्नाळूपणा विटला होता....हालचाल होती, पण त्यांत त्राण नव्हता...वोलण्यांत फक्त तिच्या अस्तित्वाचा भास होता, एरव्हीं अशी झोपलेली कमा मी पाहिली असती तर..



—विजय हरि वाडेकर

हळूंच तिच्याजवळ गेलो असतो. तिच्या अवखळ केसांवरून हात फिरवला असता अन् अलगद माझ्या दोन्हीं हातांनीं तिचा चेहरा ओंजळून घेतला असता. . . .अन् माझे ओंठ. . . .

राजेशच्या रडण्यानें कमाची आई तिकडे गेली. मी फक्त बसून सारं पहात होतो. सासूबाई सारं प्रेमाच्या पोटीं करत होत्या. पण मधूनच सोडलेला सुस्कारा थकलेल्या मनाचा, अन् शिणलेल्या शरीराचा होता. माझं तरी काय होतं. पैसा आहे, तोहि येत होता—येणाऱ्या वाटेनें परतत होता. ब्लॉक छान होता. फर्निचर आराम देणारं होतं—रंगरंगोटींत आधुनिकता होती—गडी माणसं होती. . . . पण त्यांत समाधान नव्हतं—त्या समाधानाला—त्या सुखाला कुठंतरी किड लागली होती. . . .कमाचं आजारपण फार हेकट होतं—हट्टी होतं—मला पोखरत होत तसं तिलाहि—दोघांनाहि खंगवत होतं. आतां, आजतरी मला या साऱ्या गोष्टींचा उबग आला होता.

"कमा झोपलीय् ?"

शेजारची प्रेमा गोखले आली होती अन् मला विचारत होती.

"हो—झोपलीय् !"

एवढंच मी दररोज बोललो तर बोलत होतो. प्रेमाच्या ओढीनें ती इथं येत होती. पोरांना खेळवत होती. थोडा बदल हिला वाटावा म्हणून बसत होती. कधीं आग्रहानं इथंहि जेवत होती—पण एवढं असतांना मी मान उंचावून तिच्याकडं कधीं पाहिलं नाहीं. आज मात्र मी तिच्याशीं जास्तच बोललो.

"बस प्रेमा !"

"डॉक्टर येऊन गेले ?"

"हो—!"

मी उगाचच तिच्याकडे रोखून पाहिलें. क्षणभर माझ्याकडं बघणारी प्रेमा नजर आणि पदर सांवरून बसली. अन् माझ्या कानांभोंवतीं गोखल्यांचे शब्द घुमले—"पोरीचं नशीब रद्दी—! काय कमी आहे प्रेमांत ! पण योगायोग नाहीं बघा ! जमलं तर बघीन नाहींतर एखाद्या विधुराच्या गळ्यांत....!" माझं मन पिसाटासारखं हंसलं. वेडंवाकडं मरकटूं लागलं. गिरक्या घेऊं लागलं. मग गोखल्यानीं तिला इथं कां पाठवावी. प्रेमाबद्दल त्यांना कांहींतरी सांगायचं होतं ? त्यांना माहित आहे कीं, कमा माझ्या संसारांत असून नसल्यासारखी आहे. आजची हांसणारी कमा थोड्या वेळानें कोमेजेल. मग गोखल्यांची प्रेमा एवढं बांधून कां येते—खचित् गोखल्यांना कांहींतरी वाटतंय् ! मला तरी आत्तां हिच्याबद्दल—प्रेमाबद्दल काय वाटत होतं....

पुन्हा दरिद्रि, कद्रू, हिडीस विचार ! असं कां—असं कां होतंय् माझं मलाच समजेना. खूप रडावं वाटलं, पण रडतां येईना. प्रेमा नजरेपुढून केंव्हांच गेली होती. वाटलं आज ऑफिसांत जाऊं नये. स्वस्थ पडून रहावं—पण तसं करून तरी काय केलं असतं. पोरांना खेळवलं असतं, छे....मुलांना खेळवतांना प्रेमा गोखलेला न्याहाळलं असतं. मी फोनपाशीं गेलो.

"हॅलो—कोण बोलतंय् !"

"मी, ल्यूसी !"

"हॅलो ल्यूसी—!" आज या शब्दांत निराळा वास होता.

"हॅलो बॉस्—!" तिनं मोकळ्या मनानें साथ दिली.

...ही पोर माझ्यापुढं नेहमीं यायची. पण मी टेबलापुढच्या पॅडमधला कमाचा फोटो आठवून तिला टाळत होतो. तिची रेखीव नजर अन् गामूळलेल्या चिंचेसारखें चोखावेत असें ओंठ—तिच्या छातीचा उभार माझ्याजवळ कॉलबेल वाजवतच येत होता. पण मी.... मी मात्र कमाच्या प्रेमाशीं प्रामाणिक होतो....

"बॉस्—!"

"हें बघ ल्यूसी—आज मी कांहीं ऑफिसांत येणार नाहीं—

"सर—"

"काय ?—"

"तुम्ही दोन दिवस नव्हता ना ?—"

"हं—"

"आजहि नाहीं ?"

"कां ग—? कामाचा ताण पडतो कां तुझ्यावर !"

" तसं नाहीं, पण— !" लाडिक आवाज कानांना गुदगुल्या करत होता. मी रंगेल हंसलो.

" हें बघ ल्यूसी—ही आजारी आहे. मला थांबलं पाहिजे ! मी खूप कंटाळलो आहे बघ ! आपली भेट होईल कीं—

" कुठं ऑफिसांत— ! "

क्षणभर मी गप्प झालो.

" हें बघ, आज सायंकाळीं ' पॅरेडाईज् 'मध्यें मी वाट पाहीन ! " माझं हावरं मन बोलून गेलं.

" खरंच येईन सर— ! "

"जरूर—जरूर ये, पण एकटी ये—अगदीं एकटी ! खूप वेळ घेऊन ये ! "

—मीच बोललो होतो हे— ! माझा माझ्यावरच विश्वास बसेना. कुठलं तरीं पिसाळलेलं—हावरं मन—चिडलेलं—उबगलेलं मन बोललं होतं—माझं मन कसल्या वासानं झिंगलं होतं, माझं मलाच कळेना दीडदोन वर्षांत मनाची चलबिचल ल्यूसी असतांना झाली नव्हती.

अजिच कां व्हावी ! कमाचा हात मी हातीं घेतला–कमाच्या पापण्यांत लपलेल्या डोळ्यांकडं मी पाहिलं–त्यावेळीं एकदम मला पूर्वीची कमा आठवली–टवटवलेंली ! नव्या भावनांनीं डवरलेली ! अशीच ती माझ्या शेजारी पडून राहत होती अन् मग मी तिच्याच केसांचा झुपका तिच्या टपोऱ्या गालावरून फिरवतांच तिनं ' अं–हं ! ' चा असा लाडिक हुंकार द्यावयाचा कीं, त्याच्या-साठींच, अन् तिच्या टपोऱ्या डोळ्यांतून दिसणाऱ्या प्रेमांत पुन्हां डोकावायला मी आतुर असे. आता ती कमा नव्हती–तें वातावरण नव्हतं–पण त्या साऱ्यांची वाट पाहाणारा मी मात्र तिथं होतो.

—जेवायला बसलो तरी आज माझं त्यांत लक्ष नव्हतं–मला फक्त खोलीपलीकडली प्रेमा गोखले अन् फोनमधली कानांशीं गोड बोलणारी ल्यूसी आठवत होती–त्यांत खंगलेल्या कमाची पुसट-सुद्धां आठवण मला येत नव्हती. मी प्रेमा गोखलेच्या बापाचा धूर्तपणा ताडला. तो कमाची वाट पाहातोय्–मी तरी आज या क्षणाला कशाची वाट पाहात आहे. वाटलं–डॉक्टरांना फोन करावा अन् विचारावं " डॉक्टर–हे किती दिवस चालणार ! तिला तरी सोडवा नाहीं तर मला तरी ! "

पण हें मला डॉक्टरांना विचारतां आलं नसतं. मनाचा कोंडमारा पाहून गोखले मला म्हणत होते 'हे बघा देशपांडे–प्रेमा तुमचीच आहे असं मानून तुम्ही चला ! तुमच्या मेव्हणीच्या जागीं ! शेजारधर्म आहे हा – कमलाबाईंकडून कसलीहि अपेक्षा नका करूं – गोखल्यांना एवढं कां वाटावं – ! त्यांच मन पवित्र असेल – माझ्याच मनाचा डावा डोळा लवला असेल. नाहीं माझी खात्री होती. तसं जर असतं तर गोखल्यांची प्रेमा, गोखल्यांशिवाय आली नसती, माझ्याशीं हंसत बोलली नसती, रांगत्या राजेशचा – रांगतेपणाचा फायदा घेऊन–त्याच रांगणं माझ्या खोलीकडे वळवून ती कॉटपाशीं कां घुटमळत होती——

मी पानावरून उठलो. हात कसातरी धुतला अन् कॉटवर पडून राहिलो. वरच्या पंख्यानं माझ्या विचाराबरोबर गिरक्या मारायचं ठरवलं पण त्याला तें जमलं नाहीं. भिंतीवरच्या कॅलेंडरवरचीं चित्रें मी पाहिली. त्यांत ल्यूसी – प्रेमा गोखले दिसली – हंसलो – कॅलेंडर-वरच्या तारखांत कांहीं कलात्मकता नव्हती तरीहि माझी नजर तांबड्या, निळ्या तारखांवरून मी किती तरी वेळ फिरवली – माझं मलाच उमगलं नाहीं, इतका वेळ—

घरांतल्या आरडाओरडीनें मी जागा झालो. कमाच्या खोलीकडं धांवलो. कमा निस्तेज झाली होती. तिची हालचाल नव्हती. मात्र बाकीचं वातावरण धूसर – अस्पष्ट वाटूं लागलं. कोणीतरी मला आधार दिला – मी कॉटवर मट्कन् बसूनच राहिलो. डोळे—नजर तारवटून गेली – पायापासून मेंदूपर्यंत गारठा वर आला – कमाच्या चेहऱ्यावरचं सारं तेज मावळलं होतं – पांढर पडलं होतं • ओंठांची लाली मावळली होती – तिचे डोळे आतां न उघडण्यासाठीं बंद झाले होते. पोरांची आठवण होऊन आणखीन् ढगाळल्यासारखं वाटलं – वाटलं चार जणांना बाहेर घालवून कमाला जवळ घ्यावं – छे: ! मेल्या माणसाला – हाडामांसाला बिलगायचं – निर्जिवीतेला जवळ घ्यायचं !——

गारठा – बोचरा गारठा वातावरणांत सांठला होता – साऱ्या निस्तब्ध वातावरणांत डोळे मिटलेलीं रात्र, गडद अंधाराची रात्र-- मी दूरवर पाहिलं – नदीच्या पलीकडं मिणमिणत्या दिव्यांची रांग दिसत होती – तीहि पेंगूळल्यामुळं मधूनच डोळे उघडत मिटवत होती. मी स्मशानांत होतो–कमाच्या देहापाशीं–झांकलेल्या–! पुन्हा न उघडण्यासाठीं–! मुसमुसून रडूं लागलो. तिच्या सात्विक, प्रेमळ प्रेमासाठीं–पोरांच्या आईसाठीं–माझ्या संसारांतल्या आनंदासाठीं –ती गेली–संपली संसाराची भातुकली–आता फक्त उरला होता चट्टामट्टा–!

–. . . चिता धडधडत होती. माझ्या शेजारी गोखले होते. पलिकडं ल्यूसीचा बाप उभा होता–मेहुणा हुंदके देत होता–गोखल्यांनीं पाठीवरून हात फिरवला–ल्यूसीच्या बापानं हात पुढं केला–मी धडकणाऱ्या चितेकडं पाहिलं–मागचीं माडाची झाडं त्या चितेला आणखीन् चेतावण्यास चवऱ्या ढाळत होती–ती चवऱ्या ढाळणारी माडं वांकून खालीं पहात खिकाळत होती अन् 'ल्यूसी–प्रेमा', 'ल्यूसी–प्रेमा' ओरडत नाचत होती. कानठळ्या बसण्याइतकीं ओरडत होती–मी दोन्ही कानांवर हात ठेवले . . .

गोखल्यांनी माझ्या खांद्यावर हात ठेवला–माझ्या डोळ्यांतल्या ओलाव्याकडं पाहात ते म्हणत होते—

"देशपांडे, अहो, प्रेमा असल्यावर तुम्हीं—

माझी दांतखीळ बसल्यासारखं झालं मला. अंधारी आली. तिथं चिता धडधडत आहे. माझी हाडामांसाची कमा कणाकणानं जळत आहे अन् मी माझ्या मनांत प्रेमा–ल्यूसीची आठवण——

मी बसकण बैठक मारली अन् जोरांत ओरडलो–'चालते व्हा–चालते व्हा इथून सारे–!' पण माझं ओरडणं कुणाला ऐकूं गेलं नाहीं. मी सुन्न झालो. ल्यूसीचा बाप 'ल्यूसी–देशपांडे' ओरडत होता–माडाचीं झाडं वांकून चवऱ्या ढाळतां ढाळतां 'ल्यूसी–प्रेमा'चा आरडा ओरडा करत होती अन् गोखले 'प्रेमा तुमचीच आहे, देशपांडे' करून समजावत होते—

मी एकदम जागा झालो. माझ्या घरांत–माझ्याच ब्लॉकमध्यें मी होतो ! स्वप्नांत सारं मी पाहिलं. कमा गेली नव्हती. किती ओंगळवाणं विद्रूप स्वप्न होतं–! माझ्या विटाळलेल्या मनाचें प्रतिबिंब होतं त्यांत–! घामेजलेल्या कपाळानं-कांपऱ्या चालीनें मी कमापाशीं गेलो. तिची नजर माझी वाट पहात होती—ती मंदपणें हांसली-अन् मी-मी हांसण्याचा प्रयत्न माझ्या रडव्या चेहऱ्यानं केला अन् माझ्या नजरेनं तिला सांगितलं–कमा–माझ्यासाठीं तरी तूं जगलं पाहिजेस ! माझ्यासाठीं . . . . निदान आपल्या राजेशसाठीं तरी–!

●●●







अनुक्रमणिका



## "आम्ही व्यावसायीक मंडळी!-

आम्हांला पगारदार लोकांप्रमाणें भरपगारी रजा मिळत नाही किंवा सेवानिवृत्तीनंतरचे मिळणारे फायदे मिळत नाहींत."

वकील, डॉक्टर यांच्यासारख्या व्यावसायीक मंडळींना स्वतःच्या पायावरच उभें रहावें लागतें. त्यांना ना भरपगारी रजा, पेन्शन, सेवानिवृत्तीनंतरचा प्रॉव्हिडंट फंड, वा ग्रॅच्युइटी आणि म्हणून ऐन उमेदीच्या काळांतच नियमितपणें आणि पुरेशी बचत करून निरनिराळ्या कारणांसाठीं 'निधि' निर्माण करून ठेवणें अगत्याचें असतें. अशी तरतूद **दी बँक ऑफ इंडिया लि.** मध्यें निरनिराळीं सेव्हिंग्ज बँक खातीं उघडून करतां येते.

# दी बँक ऑफ इंडिया लि.

टी. डी. कंसारा,
जनरल मॅनेजर



B/C 163 MAR



अनुक्रमणिका




:: ३ ::

**आर्टिक** महासागर हा आमच्या अमेरिकेच्या जवळजवळ दुप्पट आकाराचा आहे. लाखों चौरस मैलांच्या या बर्फाखालीं एखादी पाणबुडी आपला मार्ग शोधीत कित्येक दिवस भ्रमिष्टासारखीं भटकत राहणें अगदीं शक्य होतें. परंतु अणुशक्तीवर चालणारी पाणबुडी आर्टिक महासागरांत प्रवेश करीत असतानांच बर्फाखालच्या प्रवासाला उपयुक्त अशी 'इनर्शियल नॅव्हीगेशन' ही पद्धती उपलब्ध झाली.

१९५८ च्या वसंत ऋतूंत एक गिड्डा पण सुदृढ, तरतरीत, कार्यतत्पर, हसरा तरुण स्केटवर आला. नॉर्थ अमेरिकन एव्हिएशनमधला तो इंजिनिअर. झेन सॅंडस्की त्याचं नांव. वर उल्लेखिलेल्या इनर्शिअल नॅव्हीगेशन पद्धतीचं एक यंत्र स्केटवर बसविण्यासाठीं तो आला होता. तो म्हणाला 'हें काम मला फार महत्वाचं वाटतय्.' कारण तो व त्याचा मदतनीस हे त्या यंत्राची देखमाल करण्यासाठीं स्केटबरोबर येणार होते. या इलेक्ट्रॉनिक यंत्राचें स्वरूप यंत्रमुग्ध करणारें होतें. त्याच्या त्या चकाकणाऱ्या नळ्या, मीटर्स, डायल्स, क्षणार्धांत चमकून जाणाऱ्या टिपक्यांच्या मालिका हें सारें गूढरम्य वाटायचें. हे टिपके पद्धतशीरपणें मोजले कीं त्यावरून यंत्राच्या यांत्रिक मेंदूत सांठविलेली माहिती मिळायची.

या यंत्राचें कार्य कसें चालतें ? या यंत्राच्या मध्यभागीं, बोट हालली तरी स्वतःचा तोल सांभाळणारे अनेक 'जिरोस्कोप' विशिष्ट रचनेनें बसविण्यांत येतात. ही रचना 'अचल' असते. म्हणजे स्केट पाणबुडी व पृथ्वी यांच्या संदर्भातच नव्हे, तर साऱ्या विश्वाच्या, अचल ताऱ्यांच्याहि संदर्भांत ही रचना 'स्थिर' राहते. आता या रचनेची स्थिरता नाहीशी करणाऱ्या साऱ्या शक्तींचा हिशेब जुळवून आणि ध्यानांत ठेवून हें यंत्र 'स्केट' पृथ्वीवर कुठेंहि असली तरी तिचें स्थान निश्चित करूं शके.

साहजिकच भव्य यंत्र विनोदाचा एक विषय बनलं. बालवीर वापरतात तसलें साधें होकायंत्र कोणीतरी एक दिवस त्या यंत्रावर चिटकवलें. 'उत्तर दिशा त्या यंत्राला नीट समजावी" म्हणून उत्तर ध्रुवाकडे जाणाऱ्या रस्त्यावर नीट खुणा करून 'एसो' कंपनीचा एक नकाशाहि कुणीतरी या यंत्राच्या खोलींत पाठवून दिला.

आतां मी निकल्सनच्या शेजारीं उभा राहून स्पिटस्बर्जकडे बोट दाखविलं. अटलांटिक महासागरांतून आर्टिक महासागरांत जाण्याचें हें परंपरागत द्वार. 'निक, इथं आपण नांगर टाकूं या. पुढचा मार्ग निश्चित करून मग बर्फाखालून पुढें प्रवास करू या." मी म्हटलं.

'या बाबतींत आपण विटमनचं मत विचारू या. बर्फाची हद्द कुठें सुरू होते, याची प्रथम निश्चिती करून मग वर येऊं या. मी त्याला आतां बोलावतों' तो म्हणाला.

वॉल्ट विटमन हा आरमारांतील हायड्रोग्राफिक ऑफिसचा बर्फतज्ञ. तो लगेच आला आणि ग्रीनलंडच्या पूर्व किनाऱ्यावरून स्पिट्स् बर्गनच्या उत्तरेपर्यंत त्यानें एक सरळ रेषा काढली.

'कॅप्टन, साधारणतः बर्फाच हद्द अशी राहील' तो म्हणाला, 'आतां वाऱ्यामुळें तें बर्फ थोडं उत्तरेला अगर दक्षिणेला सरकेल.

स्पिट्स् बर्गच्या पश्चिमेला असलेल्या एका लांबट अरुंद बेटाकडे निकल्सननें बोट दाखविली. 'बर्फाचं हें जर असं चित्र असेल तर या ठिकाणीं आपणाला पृष्ठभागावर यायला हवं–किनाऱ्याजवळ

*ध्रुव प्रदेशावर झेंडा गाढण्यास निघालेली 'स्केट' अनेक संकटांना तोंड देत पुढें पुढें सरकत होती. सर्वांची मनें भीतिनें थरथरत होती. तरी स्केट अजून मार्ग आक्रमतच आहे....! श्री.* **जेम्स कल्व्हर्ट** *यांनी लिहिलेल्या आपल्या आवडीच्या सत्यकथेचा हा चित्तथरारक असा पुढील भाग....*

---

खोल पाणी आहे. आणि या पर्वतामुळें राडारचे संदेश घ्यायला मदत होईल.'

निकल्सन दाखवीत होता तें प्रिन्स कार्लस् फोरलंड वेट डेन्स वेटाच्या लगत दक्षिणेला आहे. नान्सेनची 'फ्रॅम' ही पाणवुडी सागरांतील प्रवाहाबरोबर तरंगत फिरणाऱ्या वर्फाबरोबर तिन वर्षं फिरत फिरत याच ठिकाणीं येऊन ठेपली होती. तिथल्या पर्वत शिखरांचा उपयोग 'फ्रॅम'च्या खलाशांनीं एक खूण म्हणून केला होता.

'प्रिन्स कार्लस् हीच जागा ठरवून टाकूं या तर. चला, सरळ तीच दिशा घ्या." मी म्हटलें.

महासागराचा मोठा नकाशा टेवलावर उघडून टेवायची आमची पद्धत होती. त्यामुळें तो प्रत्येकाला पहातां येई. मी माझ्या खोलीकडे जात असतां दोघा खलाशाचं भाषण माझ्या कानावर पडलं तें असं—

एक उंच टार्पेडोमन म्हणत होता, 'दोस्त आपण खरोखरीच या महासागरांतून फार वेगानं प्रवास करीत आहोंत. आपण अगदीं लौकर उत्तर ध्रुवावर पोचूं.'

'आपण किती जलद जाऊं याचं फारसं महत्व नाहीं.' त्याचा मित्र म्हणाला. 'आपण तिथं सर्वांच्या अगोदर गेलं पाहिजे. ॅटिलसला ही संधी मिळाली होती. आतां अ.पल्याला मिळते आहे.

त्यांचं संभाषण ऐकून माझं हृदय जडशील झालं. कारण एक गोष्ट मी त्यांना सांगूं शकत नव्हतों– माझ्या मनांतून ती सांगायची होती तरी सांगूं शकत नव्हतों. ती त्यांना कळली तर– या नुसत्या विचाराचीच मला भीति वाटत होती. मी माझ्या खोलींत गेलों तेव्हां मला अगदीं खिन्न वाटत होतं. पाणवुडीच्या कप्तानाला आपल्या हाताखालील माणसं आणि त्यांच्या भावना याविषयीं काय वाटतें तें सांगणें कठीण आहे. मी दहा मिनिटांत स्केटवर फिरून त्या साऱ्यांच्या भावना काय आहेत तें सांगूं शकेन. त्याक्षणीं त्या साऱ्यांच्या मनांत काय आहे हें सांगणं तर अगदीं सोपं होतं. त्यांच्याच शब्दांत सांगायचं तर ते 'चौखूर' धांवायला अगदीं फुरफुरत होते.

जहाजावरील खलाशी हे आपल्या जहाजाशीं विलक्षण एकनिष्ट असतात आणि इतर जहाजाशीं स्पर्धेची भावना तीव्रतेनें वाळगून असतात. खलाशी जितके जास्त चांगले तितकं त्यांचं मनोधैर्य उच्च प्रतीचं असतं, तितकेच ते इतर जहाजाशीं स्पर्धा करायला उत्सुक असतात. ('स्केटपेक्षां अधिक चांगलं जहाज ? आज तागायत तसं कांहीं ऐकलं नाहीं, मॅक !")

यांत इतर जहाजांनां अगर त्यावरील लोकांना हिणवण्याचा त्यांचा मुळींच उद्देश नसतो. स्केटवरील एक तृतियांश अधिकारी आणि पुष्कळसे खलाशी हे स्केटपूर्वी नॉटिलसवर नोकरीला होते. नॉटिलस ही एक पहिल्या दर्जाची पाणवुडी आहे याची त्यांना जाणीव होती. पण आतां ते स्केटवर आलेलें होते आणि स्केटचाहि दर्जा तितकाच मोठा ठरायला हवा अशी तळमळ त्यानां होती. त्यामुळेंच 'नॉटीलस' ही या क्षणीं त्यांची सर्वांत मोठी प्रतिस्पर्धी होती.

ही स्पर्धा विशेष तीव्र झाली, ती उत्तर ध्रुवावर जाण्याच्या बाबतींत. अगोदरच्या हिवाळचांत नॉटिलस उत्तर ध्रुव शोधायला गेली होती पण होकायंत्राच्या अडचणीमुळें तिला वाटेंतूनच माघारीं परतावं लागलं होतं. त्यामुळें स्केटवरच्या खलाशांना वाटूं लागलं कीं आपणच प्रथम ध्रुवावर पोचूं.

पण आमचं दैव आम्हांला अनुकूल दिसत नव्हतं. आम्ही प्रवासास निघण्यापूर्वी थोडावेळ अगोदर मला सांगण्यांत आलं होतं कीं 'नॉटिलस'च्या ध्रुवप्रवासाची एक अत्यंत गुप्त अशी योजना पुन्हां एकदां आखण्यांत आली आहे.

'स्केट' सुद्धां त्या दिशेनं जायची होती. पण ती वर्फाच्छादित सागरांत पृष्ठ भागावर येण्याचें तंत्र प्रयोगानें निश्चित करण्यासाठीं. ध्रुवावर ती 'नॉटिलस' पूर्वी पोचणार नव्हती. मात्र या गोष्टीची वाच्यता कोणाजवळ, अगदीं निकटच्या अधिकाऱ्याजवळहि करायची नाहीं, असा इशारा मला देण्यांत आल होता.

'स्केट' पुढील कामगिरी वैज्ञानिक आणि लष्करी अशी दुहेरी होती. फारच थोडा परिचित असलेल्या आर्टिक सागरांत लष्करी हालचाली करण्याची आमची क्षमता अजमावणं हें स्केटचं काम होतं.

उत्तर ध्रुवावर 'नॉटिलस' प्रथम गेली कीं 'स्केट' प्रथम गेली या गोष्टीला फारसं महत्व नव्हतं. पण माझ्या माणसांची दृष्टी तशी नव्हती. उत्तर ध्रुवावर प्रथम जाण्याचा मान त्यांना– म्हणजे 'स्केट' ला मिळायला हवा होता.

माझ्या माणसांची निराशा अटळ होती पण त्यांच्या मनाची त्यासाठीं तयारी करण्याच्या बाबतींत मी कांहीं करूं शकत नव्हतो, कांहीं बोलूं शकत नव्हतों.

## :: ४ ::

ऑगस्टच्या नऊ तारखेस साधारणशा धुक्यामधें, प्रिन्स कार्लस् फोरलंडकडे स्केट फार सावधपणें जाऊं लागली. आम्ही 'लोरान'च्या कक्षेबाहेर होतो. पण 'डेड रेकनिग' आणि 'इनर्शियल नॅव्हीगेशन' वरून लक्षांत आलं कीं आम्ही मुक्कामाच्या जवळ आलों आहोंत. समुद्रांतून दहा दिवस प्रवास केल्यावर धुक्यांतून खडकाळ किनाऱ्याकडे जातांना एकच शब्द जिभेवर होता— सावधान. आमच्या

बोटीच्या अँटेनाचा तारांचा झुबका पाण्यावर डोकावूं लागला; समुद्राचं शांत पाणी कापीत पुढें निघाला आणि बी. बी. सी. वरून ध्वनिक्षेपित केलेली एक बातमी एकाएकीं आमच्या कानावर आदळली.

'अणुशक्ति संचलित अमेरिकन पाणबुडी नॉटिलस–हिच्या चित्त थरारक बातमीनं जग काल आश्चर्यचकीत झालं. तिनं पॅसिफिक महासागर ओलांडून अटलांटिकमध्यें प्रवेश केला आहे. आणि वाटेंत तिनं उत्तर ध्रुव ओलांडला आहे. ही जगविख्यांत पाणबुडी साधारणतः . . . . . . '

पुढचं कांहीं ऐकूं आलं नाहीं. पण जें ऐकलं तें सर्व जहाज-भर क्षणार्धांत पसरलं. आतां त्यांना सारं कांहीं कळलं. अगदीं नको त्या क्षणीं ही बातमी आली होती. समुद्रपृष्टापासून वर्फाखालीं शिरण्याच्या कांहीं तास अगोदर ही बातमी आम्ही ऐकली. मला मात्र माझ्या डोक्यावरचं एक मोठं ओझं उतरल्यासारखं वाटलं. आम्ही उत्तरध्रुवावर प्रथम पोचलों असं माझ्या खलाशांना वाटावं, ते आनंदांत असावेंत, आणि मागावून त्यांना सत्य कळावं कीं उत्तर ध्रुवावर प्रथम जाण्याचा मान त्यांच्या अगोदर दुसऱ्याच बोटीनें मिळवला आहे! असं होण्यापेक्षां हें सत्य त्यांना आतांच कळलं हें वरं झालं.

तें कसंहि असलं तरी माझ्या अपेक्षेपेक्षांहि वाईट गोष्टी घडत होत्या. माझ्या सहकाऱ्यांची उत्साही आतुरता आकाशाला भिडण्या-इतकी उत्तुंग होती ती आतां एकदम कोलमडून भुईसपाट झाली. दूरध्वनिक्षेपकावरून मी त्यांना सांगितलं कीं, आपल्या स्केटच्या प्रवासाचा खरा हेतू काय हें आपण नजरेसमोर ठेवलं पाहिजे. आपण नौदलांत जी नोकरी करतों ती आपल्या देशाची सेवा करावी ह्या उच्च हेतूनं. वृत्तपत्रांतून आपल्या जहाजाचं ठळकरित्या नांव यावं म्हणून नव्हे.




पण माझं हें म्हणणं त्यांनीं फारसं ऐकलं असं मला वाटत नाहीं. पण तरीहि त्यांनीं लगेच आपल्या मनाला सावरलं आणि आपा-पलीं कर्तव्यं वजाववयास सुरवांत केली. आणि थोड्याच वेळांत, आम्हीं वर्फाखालीं जाण्यापूर्वीं 'नॉटिलसला' पाठवावयाचा संदेश घेऊन निक माझ्याकडे आला.

'कमांडर अँडरसन आणि नॉटिलसवरील सर्वजण
स्केटवरील आम्हां सर्वांतर्फे तुमचं मन:पूर्वक अभिनंदन.'

त्या संदेशावर मी स्वाक्षरी केली व निकला तो पाठवावयास सांगितलं. आमच्या क्षणिक निराशेमागील आमची खरी प्रामाणिक वृत्ति या संदेशांत दिसून येत होती.

माझे विचार भूत काळांतील हिवाळ्यांतील एका दिवसाभोंवतीं घिरट्या घालूं लागले. स्केटच्या चाचणी सफरींत इंग्लंडमध्यें थांवलों होतो, तेव्हां प्रसिद्ध धाडसी ब्रिटिश प्रवासी रॉबर्ट फाल्कन स्कॉट, याच्या दैनंदिनीतील कित्येक पानं आम्ही तिथे पाहिलीं. त्यांतील एक परिच्छेद परत परत माझ्या नजरेसमोर आतां येतोय्. १९१२ च्या जानेवारीमधें तो लिहिला होता. दक्षिण ध्रुवावर जायचें हें त्याचें व त्याच्या चार सहकाऱ्यांचें कित्येक वर्षांचें स्वप्न. व कितीतरी अडचणी ओलांडून व वर्ष घालवून ते आपल्या ध्येयाच्या जवळपास आले होते; आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं ते उठले व पहातात तों त्यांना, थोड्याच दिवसांपूर्वी तिथें येऊन गेलेल्या अमुंडसेनचे तंबू व त्यांनीं मागें ठेवलेल्या इतर निशाण्या दिसल्या.

'हे नार्वेजियन्स आमच्या पुढें आले आहेत व दक्षिण ध्रुवावर प्रथम पोचले आहेत. भयंकर–– भयंकर निराशा आहे ही. माझ्या एकनिष्ट सहकाऱ्यांबद्दल मला फार वाईट वाटतं. सर्व दिवा–स्वप्न हीं पुसून टाकलीं पाहिजेत....'

अशावेळीं कोणत्यातरी महत्वाच्या कामांत गर्क होणं हा उत्तम मार्ग. मी तेंच करायचं ठरविलं.

प्रिन्स कार्लस् फोरलंडच्या दिशेनं स्केटनं प्रवास सुरू केला. शेवटीं राडर फलकावर बोटाच्या किनारपट्टीची हिरवी छाया-रेखा दिसूं लागली; आणि स्केट नक्की कुठें आहे तें आम्ही नकाशावर दर्शवूं शकलों. अद्यापपर्यंत वर्फ कांहीं दिसत नव्हतं तरीहि आम्ही पाण्याखालीं तिनशें फूट गेलो आणि सहाशें मैल दूर असलेल्या उत्तर ध्रुवाच्या दिशेनं सरळ मार्गक्रमण करूं लागलों. आम्ही असे उत्तरेच्या दिशेनं मार्गक्रमण करीत असतां, आमच्या वरच्या बाजूचा फॅदोमीटर पृष्ठभागाकडे विशिष्ट ध्वनी पाठवीत होता. वर्फाची चाहूल लागेल का पहात होता. पण आतापर्यंत त्यानें फक्त पाण्याची नोंद केली होती.

अद्यापपर्यंत आम्हांला वर्फ कां दिसलं नाहीं हें आम्हां कोणालाच कळेना. दक्षिणेकडील वाऱ्यानं सारं वर्फ त्याच्या नेहमीच्या जागेहून

दूर नेलं का ? मध्यरात्रीं पर्यंत मला यांतली अनिश्चितता असह्य होऊं लागली आणि या गोष्टीचा सोक्षमोक्ष करायचं मी ठरविलं. मी समुद्राच्या पृष्टभागापर्यंत स्केट अत्यंत काळजीपूर्वक आणली आणि अत्यंत मंदपणें पॅरिस्कोप वर केला. धुकं दूर झालं होतं त्यामुळें अर्धवट काळोखांत शांत पाण्यावरून मला आजूबाजूला पाहतां येत होतं.

एकाएकीं माझ्या काळजाचा एक ठोका चुकला. उत्तर क्षितिजावर दूरवर एक धूसर शुभ्ररेषा पसरलेली दिसत होती. बर्फाच्या त्या प्रचंड तरंगत्या थराकडे पाहून भय वाटलं. लगेच आम्ही आमचं जहाज पुन्हा तीनशें फूट पाण्याखालीं नेलं. थोड्याच वेळांत बर्फ शोधणाऱ्या यंत्रानं बर्फाच्या शीलाच्या शीला आमच्या डोक्यावरील समुद्र पृष्ठावर तरंगत असल्याचं दर्शविलं. त्या यंत्राच्या जोरजोरानें फिरणाऱ्या काट्यानं त्या बर्फशीलांची भली मोठी छेद–रेषा दर्शविली. नंतर केवळ पाण्याचा भाग आला कीं तो कांटा बारीक काळी रेषा दर्शवी. तें पहाणं मोठं गमतीचं होतं. या यंत्राचा जनक डॉ. वाल्डो लायन याचा मदतनीस रेक्स राडरे हा त्या यंत्राचं संचलन करीत होता. आणि लौकरच त्याच्या भोंवतीं त्या जादूच्या यंत्रांतून दिसणारं दृश्य पहायला प्रेक्षकांची गर्दी जमली.

तशीं १६ नॉटच्या गतीनं आम्ही जसजसे उत्तरेच्या दिशेनं जात होतो, तसतसा बर्फाचा थर जाड होऊं लागला. शीलाखंड एकमेकांना घट्ट चिकटलेले दिसूं लागले. आतां पुढें समुद्राच्या पृष्ठभागावर उघडे तलाव नव्हते. बर्फ शोधणाऱ्या यंत्राच्या काट्यानं मैलच्या मैल बर्फखंडाचा खालील भाग दर्शविला. क्वचित् केव्हांतरी तो प्रचंड अशा गोळ्याच्या आकाराचा दिसे. दोन तरंगते थर एकमेकांवर आदळल्यामुळें निर्माण होणाऱ्या बर्फाच्या टेकड्या होत्या. यंत्राभोंवतीं जमलेल्यांची निरुद्योगी बडबड हळूहळू कमी होत गेली व शेवटी थांबली. आतां आम्हां सर्वांच्या चेहऱ्यावर दडपणाची– अनामिक भीतिची– छाया दृग्गोचर होऊं लागली. आम्ही आतां सर्वस्वी आमच्या पाणबुडीवर अवलंबून होतों.

कंट्रोल सेंटरमधें धूसर तांबडा दिवा लागला होता. येथील अधिकाऱ्याला रात्री पेरिस्कोपमधून बाहेरील दृश्य पहातांना त्याच्या डोळ्यांना ताण पडूं नये हा उद्देश. पण आतां काही वेळ पेरिस्कोपचा कांहींच उपयोग होणार नाहीं, याचा आम्हीं विचारच केला नव्हता. त्या धूसर तांबड्या प्रकाशांत पाणबुडी चालविणारी माणसं, पाणबुडीची समुद्र सपाटीपासूनची खोली आणि पाणबुडीचा मार्ग सांभाळण्याचीं त्यांची कामं व्यवस्थितरित्या पार पाडीत होतो. कुणी बोलत नव्हतो, फक्त बर्फ शोधणाऱ्या यंत्राचा 'व्हिश्-व्हिश्-व्हिश्–' असा आवाज खोलीच्या मागच्या बाजूकडून येत होता.

आतां आम्ही चाललो होतों त्या प्रदेशाच्या नकाशावर बिनचूक नोंदी नव्हत्या. निकहसन बारकाइनं खोली मोजणारा फॅदोमिटर पहात होता. कंट्रोल रूम मधून 'पिंग्' असा आवाज घुमला. ५००० फूट खोल असलेल्या महासागराच्या खालच्या बाजूने पुसत प्रतिध्वनि ऐकूं आला. आमच्या शेजारच्या खोलींत दुसरं एक यंत्र होतं, त्यांतून ध्वनि लहरींचं प्रक्षेपण होई, त्याचा आवाज होई. एखादा बर्फाचा प्रचंड कडा जवळपास आहे कीं काय हा विचार रक्त गोठून टाकणारा होता– आमच्या सभोंवतालच्या काळ्याशार पाण्यांत त्या ध्वनि लहरी जात.

इंजिन–खोलींत नजर टाकावी म्हणून मी मागच्या बाजूला चाललो. तिथं जाणं म्हणजे जणूं काय दुसऱ्या जगांत प्रवेश करण्यासारखं होतं. इथं कंट्रोल-सेंटरसारखा धूसर तांबडा उजेड नसून ट्यूबलाईटचा प्रखर पांढराशुभ्र उजेड होता. चमत्कारिक इलेक्ट्रॉनिकचा प्रखर पांढरा शुभ्र उजेड होता. चमत्कारीक इलेक्ट्रॉनिकच्या आवाजा ऐवजीं आता होणारा आवाज हा टर्बाइनचा, जहाजाच्या पंख्यामध्यें शक्ति सळसळत जाते तेव्हांचा गिअर्सचा ठणठणीत आवाज होता. आमच्या डोक्यावरील बर्फवट तयार होण्यापूर्वी, किंबहुना ही पृथ्वी निर्माण होण्यापूर्वी युरेनियमच्या अणुमधें सांगितलेली ही शक्ति आहे.

आमच्या स्केटचे पंखे आम्हांला उत्तर ध्रुवाच्या बर्फांत क्षणाक्षणाला आंत आंत नेत होते– क्षणाक्षणाला आम्ही संकटाच्या जवळ जात होतो ही गोष्ट माझ्या खोलींत एकटा राहून मी सहन करूं शकत नव्हतो. जर कांहीं संकट आलं तर आम्हीं मागें मोकळ्या पाण्यांत परत जाऊं शकूं का ? मी स्वतःला बजावलं कीं असले विचार माझ्या मनांत येतां कामा नयेत. पण मन आवरण्याचा निष्फळ प्रयत्न केल्यावर मी इतर कुणाकडे नव्हे तरी स्वतःकडे कबूल केलं. मी घाबरलों होतों.



### हम अैसा नहीं करेगा–

एका श्रीमंत गुजराथी बाईकडे एक चिनो नोकर होता. चीन–हिंदुस्थान–प्रकरण ऐन भरांत असतांना त्याला बोलावून बाई म्हणाली.

"चाँग, अभी चीन हिंदुस्थानका झगडा चालू है, तुम रातको आके हमारा गला तो नहीं दबायगा ?"

"नो, मेमसाब, "चाँग म्हणाला, "हम ऐसा नहीं करेगा. कभी नहीं करेगा. हम छुरो लेके तुम्हारा गला काट देगा."

आणि हें स्वत:शींच कां होईना पण कबूल केल्यामुळें मला बरं वाटलं. अज्ञान आणि स्वैर कल्पनाशक्ति यांचं घाणेरडं मूल म्हणजेच भीति. पूर्वि एकदां मला ती वाटली होती. १९४३ मधली गोष्ट. तेव्हां मी 'जॅक' या पाणबुडीवर होतों. महायुद्ध चालू होतं आणि मी जपान्यांविरुद्ध समुद्रावर गस्त घालीत होतो. माझ्याकडून हें काम पूर्ण होईल का, ही ती भीति. पण जेव्हां माझं तें काम यशस्वीरीत्या पुरं करून मी आलों तेव्हां माझी ती अनामिक भीति नाहिंशी झाली, आणि चिंता करायचं मी बंद केलं.

पण त्या वेळच्या आणि आतांच्या परिस्थितींत एक मोठा फरक होता. मी तेव्हां जरी अगदीं नवा नसलों तरी माझ्या बरोबर एक अनुभवी कप्तान होता व संकटाच्या वेळीं त्याचा सल्ला उपयोगी पडणारा होता. आणि इथं स्केटवर आतां माझ्या मनांत भीति-शंका कोणीहि डोकावोत, माझ्या चेहऱ्यावर त्याचा इवलासाहि परिणाम दृग्गोचर होतां कामा नये. कप्तान म्हणून माझ्या चेहऱ्यावर यशा विषयींची खात्री मला दाखविलीच पाहिजे.

निकल्सनसारखे सहकारी इथं आहेत ही किती भाग्याची गोष्ट ! मी माझं थोडसं ओझं त्याच्या खांद्यावर टाकूं शकतोच कीं. अर्थात् यावावत आम्ही परस्परांशीं प्रत्यक्ष कांहीं बोलत नव्हतो. मी कंट्रोल सेंटरमधें गेलों. निक तिथं आपल्या टेवलावर काम करीत होता.

'निक' मी म्हटलं, 'मी थोडिशी विश्रांती घेतो, तोंवर तूं हें सारं पहाशील का ?'

चार तासानंतर मी, कसं काय चाललं आहे हें पहाण्यासाठीं कंट्रोलसेंटरमध्यें गेलो. स्केट उत्तर ध्रुवाच्या दिशेनें सरळ मार्ग कापीत होती. तिची गती तासाला १६ नॉट– म्हणजे मिनिटाला ५०० यार्डांहून जास्त होती. आम्ही बर्फयुक्त प्रदेशांत १०० मैल आंत होतों. आतां कांहीं संकट आलं तरी आम्हांला इथून आंतूनच त्याच्याशीं दोन हात करावे लागणार. कारण बर्फाला उघाड पाहून वर पृष्टभागावर येऊं म्हणावं तर तें शक्य नव्हतं.

बर्फ शोधणाऱ्या यंत्राकडे मी पाहिलं. तें, आमच्या डोक्यावरील बर्फ स्वच्छपणें दर्शवीत होतं. क्वचित् एखादवेळीं वरती उघडं पाणी असल्याची खूण– टेपच्यावरती बारीक काळी रेषा दिसे. त्याचा अर्थ बर्फमय पृष्ठभागाएवजी आम्हीं पाणी असलेल्या एका तळ्याखालून गेलों असा होता. नंतर ती रेषा खालच्या बाजूला विलीन होई व मग बर्फ-शीलांचे चित्र दिसूं लागे.

आमचे बर्फतज्ञ वॉल्ट विटमन् यांनीं या तळ्यांच्या निर्मितीसंबंधीं खुलासा केला. वारे आणि आर्टिक महासागरांतील पाण्याचे प्रवाह हे समुद्रपृष्टावरील बर्फावर सतत मारा करीत असतात. त्यामुळें बर्फाचा पापुद्रा फुटतो, आणि मग हे बर्फाचे कित्येक मैल घेरांचे थर इतस्ततः तरंगूं लागतात. कधीं तें एकमेकांवर आदळून प्रचंड कडे तयार होतात. तितक्याच रहस्यमय रीतीनें कांहीं थर परस्परांपासून दूर होतात, आणि त्यामुळें पाण्याची हीं तळीं निर्माण होतात.

उत्तर ध्रुवाकडील प्रदेशांतील या मोकळ्या पाण्याला आम्ही 'तळं' असं म्हणतो पण वॉल्टेनने त्यामध्यें शास्त्रशुद्ध भेद केला. (१) बर्फाला पडलेलें लांबलचक तडे– त्याला 'लिड्स्' असं म्हणतात. हे तडे बर्फाच्या दोन थरांमध्यें वर्षभर दिसतात. आणि, (२) वेडावाकडा तळ्यासारखा भाग. हा भाग बहुधा त्या तड्यापासून निर्माण होतो. आर्टिक महासागरांत उन्हाळ्यांत तो दिसतो. या तऱ्हेच्या निवळ पाण्याच्या भागाला 'पुलीन्य' हा रशियन शब्द वापरतो. त्याचा अंदाजें अर्थ 'बर्फांतला पाण्याचा उघडा भाग' असा होतो.

हे 'पुलीन्य' प्रसरण पावत असतात. ते उघडे असतात – उन्हाळ्यांत विशेषेंकरून. त्यावेळीं आर्टिक महासागराचं सर्वसामान्य उष्णतामान ३२° फॅरेनहाइट असतं. तेंच उष्णतामान हिवाळ्यामध्यें शून्याच्या खालीं ३२° फॅरेनहाइट इतकं उतरतं. त्यावेळीं हे तडे जास्त रुंद होण्यापूर्वींच गोठतात.

वॉल्टनें आम्हांस हें सुद्धां सांगितलं कीं ह्या तड्यांची रुंदी कमीतकमी कांहीं यार्ड व जास्तींत जास्त कित्येकमैल असूं शकतें. सामान्यतः तें लांब असतात व केव्हां केव्हां त्यांची लांबी मैलच्या मैल असूं शकतें. पुलीन्याचे सुद्धां विविध आकार असतात. कांहीं छोट्या डबक्यांच्या आकारांचीं असतात तर कांहीं शेंकडों यार्ड रुंदीचीं असतात. बर्फाचा प्रदेश सुरू झाल्यापासून साठ मैलांच्या पुढें, ज्याचा आमच्या दृष्टीनें उपयोग होईल, इतपत मोठ्या घेराचें एकहि तळें आम्हांला दिसलें नाहीं.

क्रमशः

अनुवाद–श्रीकृष्ण ठाकूर

## महत्वाची सूचना–

ज्यांची वर्गणी या अंकानें संपते त्यांनीं कृपा करून येत्या १० तारखेच्या आंत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाहीं.

— व्यवस्थापक

अनुक्रमणिका






**स्फोट**

[पान १६ वरून]

जानकीबाईच्या हवाली केला आणि ते बाहेर आले. पॅंटीचा पट्टा आवळत म्हणाले, "धोतराची कांस सोडणार नाहीं कां ? आज सोड !' दोन्ही खिशांत हात टाकून ते रूबाबानें गॅलरींत फिरले.

"अण्णा, रूवाब नही मंगता ! रोज कांसेवर भागतं. आज पॅंट सोडून नेईन !"

जगूअण्णा टरकले. आणि खरोखरच रंगा पॅंट सोडील या भीतीनें ते खोलीच्या दरवाजावर येऊन उभे राहिले.

"तुम्हीं आंत या. तो द्वाड पोर नसता गोंधळ करील !" जानकीबाईहि आंतून घाबरल्या.

मोठमोठ्यानें हंसत रंगाजी आपल्या खोलीकडे वळला.

आई जपमाळ ओढत दारांतल्या वेताच्या खुर्चीत बसली होती.

तिनें कींव यावी अशा नजरेनें रंगाकडे पाहिलें.

तिच्या डोळ्यांकडे पहात रंगाहि आंतून हालल्यासारखा झाला.

"रंगा, कांहीं खायला देऊं ?"

"नको !"

"कां ? खा थोडं. तोंड सुकलंय बघ !" आई म्हणाली.

रंगाजो पुनः एकदां देठापासून हालला. डोळ्यांच्या पापण्यांना आंतून पाझर फुटल्यासारखें झालें. बाहेरून एवढा हंसलों, सर्वांना हंसवलें तरी आंतून खिन्न आहे हें आईनेंच तेवढें ओळखलें.

"नको ! आज सोमवार आहे. आजपासून सोमवार करीन म्हणतो."

आई एकदम हंसली. कुठून तरी आंतून हंसली. आणि तिनें रंगाला पोटाशीं धरलें. बराच वेळ त्याला ती थोपटत राहिली.

चंपूचेंहि असेंच विलक्षण प्रेम. तीहि अशीच जवळ घेऊन थोपटते. कानांत फुंक मारल्यासारखी बोलते. "रंगाजी, पुरे आतां टवाळखोरपणा. सुधारणार कधीं ?"

आईच्या मांडीवर डोकें असतांना तो चंपूचाचा विचार करीत राहिला. काय ऋणानुबंध असताव कोण जाणे !

एकदां शनिवारीं दुपारीं चंपू आपल्या खोलींत चटई टाकून पडली होती. तिची ती नेहमीचीच संवय होती. दार उघडें ठेवून चटई टाकायची. मोटरची ट्यूब फुगवून टाकल्याप्रमाणें अंग आडवें करायची. मांडीवर आडवा पाय टाकून कांहीं तरी वाचत पडायची. तशीच झोपून त्या दिवशीं ती पेपर तपासत पडली होती. डग्गळ पट्कोनी लाल पेन्सिल तोंडांत आडवी टाकून चुप्चुप् आवाज करीत चोखत होती.

ठुसठुशीत कागदी लिंबासारखी. तरुण होती. पण विधवा. अळशीएवढा काळा ठिपका दोन भुंवयांमध्यें लावायची. आणि खाल मानेनें शाळेंत जायची. घरांत एकटीच वावरायची. वावरायची म्हणण्यापेक्षां अशीच बहुधा पडून राहायची. वयानें रंगापेक्षां ती पांच-सात वर्षांनीं मोठी होती.

"काय करतो आहेस रे रंगा ?" एकदां आपणहूनच म्हणाली.

"कांहीं नाहीं ! कां ?" रंगाजीची छाती सूक्ष्मशी धडधडली.

"जरा बैस ये. मार्कांची बेरीज कर–"

शान्तूच्या दुकानांत काजें पाडल्यासारखा तो मार्कांची बेरीज करूं लागला. पेपरच्या पहिल्या पानावर डग्गळ आंकडे टाकूं लागला. बेरीज करतांना त्याचें मन विचलीत झालें. तिच्या अंगाला दमटसा पण हवाहवासा वाटणारा गंध येत होता. त्या गंधानें तो नारल्यासारखा झाला. पण त्यानें बेरजा चुकवल्या नाहींत. मग ती त्याच्या मांडीवर भार टाकीत उठली. आणि तिनें त्याला वाटीभर सांजा दिला.

"मार्कांची बेरीज केलीस. खा सांजा !"

तिच्या आवाजांत एक प्रकारचें खिन्नतेचें सुत होतें.

त्यानंतर दोन दिवसांनीं रंगाजीनें तिच्या शाळेवर चक्कर टाकली. बोलाफुलाची गांठ. तिची भेट झाली. ती त्याला हॉटेलांत घेऊन गेली. तिथें जादू झाली. चंपूचें दार नुसतें बंद असे. मध्यरात्रीं तें दार लोटलें जाई. त्यावेळीं गॅलरींतली रंगाची वळकटी रिकामी असे.

आई अजून त्याला थोपटत होती. तिला रडावेसें वाटत होतें. पण डोळ्यांत ओल नव्हती. रंगासाठीं रडून रडून तिचे डोळे तडतडीत सुके झाले होते.

"रंगा, झोपण्याआधीं कपभर दूध घे. नाहीं तर उपास लागेल तुला पोरा." तिनें त्याच्या केसांतून हात फिरवला. त्याचें मस्तक त्रासानें तापलें होतें.

"रात्रीं तेल घालीन माथ्यावर. मग थंडसा झोप."

**मोहिनी अस्त्र**



"अगं वेडे ! मी तुला त्याच्यावर हलकेंच प्रेमाचे जाळे पसरावयास सांगितले होते !"

दूध पिऊन रंगा वळकटीवर उताणा पडला. बराच वेळ तसाच पडला. सगळ्या खोल्यांचीं दारें बंद झालीं. कांहीं खोल्यांतून घोरण्याचा सुद्धां आवाज झरकला.

मध्यरात्रीं आई झटकन् जागी झाली.

"पोराच्या माथ्यावर तेल चोळायला विसरले—"

तेलाची झारी घेऊन ती बाहेर आली. रंगाची गादी रिकामी होती.

तिला पुन: धक्का बसला. तोंडांतून धग-धगते श्वास सोडत ती पुन: आंत आली आणि स्वत:च्या कर्माला दोष देत बिछान्यावर आडवी झाली.

चंपूला दोन हात दूर ठेवून रंगा प्रथमच रडला.

"झालं काय ?" चंपू गडबडून गेली.

"स्पष्टच सांगतो. लग्न करणार असशील तर पाय ठेवीन इथं ! मला बाकीचे फंद नकोत."

चंपूनें त्याला घट्ट छातीशीं आवळून धरलें. तो मुसळासारखा ताठ उभा होता. त्याच्या छातीवर खमीस भिजलें होतें.

"करीन-करीन. माझ्या पगारावर भागवीन. तूं मार्कांच्या बेरजा कर-" ती खुदकन् हंसली.

थोड्या वेळानें तेलाची झारी घेऊन आई बाहेर आली.

डोक्यावर हात आडवा घेऊन रंगा बिछा-न्यांत झोपलेला होता.

"आत्तां येऊन गेले. कुठं गेला होतास?" रंगा बोलला नाहीं.

त्याच्या डोक्यावर तेल घासत आई किती तरी वेळ तिथेंच बसली. रंगाची टाळू तापली होती. तेल चोळून चोळून ती टाळू थंड करीत होती.

"किती दगदग करतोस ! वणवण उन्हां-तान्हांतून भटकतोस ! कसं व्हायचं तुझं ?"

आई स्वत:शींच बडबडत होती.

रंगाला मात्र कधींच झोप लागली. त्यालाहि कळलें नाहीं. तिलाहि कळलें नाहीं.

दुसरे दिवशीं आई भाऊला म्हणाली,

"भाऊ, रंगा सुधारतोय रे ! त्याला कुठं तरी फॅक्टरींत चिकटवून दे.

"करणार आहेस का नोकरी ?" भाऊनें विचारलें.

"करीन—"

त्या आठवड्यांतच रंगा नोकरीला लागला.

नोकरीला लागतांच रंगा सुतासारखा वळला. एकदम स्वप्नांत मश्गुल झाला. आयुष्यांत त्यानें आतांपर्यंत स्वप्नें रंगवलीं नव्हतीं. पगारांतून खर्च कसा करायचा याचा त्यानें प्रथमच विचार केला. पुढें मिळणाऱ्या पगाराची आंकडेवारी करण्यांत त्यानें थोडा वेळ घालवला.

पण कारखान्यांत एकदां अचानक स्फोट झाला. काय झालें तें रंगाला धड कळलेंसुद्धां नाहीं. कानाचे पडदे टरकावणारा प्रचंड आवाज त्यानें ऐकला आणि भडकणाऱ्या ज्वालांचे आणि धुरांचे अजस्त्र लोट त्यानें पाहिले. ऐकलें आणि पाहिलें तें तेवढेंच. बसल्या जागे-वरून तो वर उडाला तेवढेंच त्याला कळलें. गाल फाटेपर्यंत तोंड उघडून तो ओरडला. आणि मग त्याला कांहीं कळलेंच नाहीं. तो खाली आपटला तेंहि त्याला कळलें नाहीं.

शुद्धीवर आला त्यावेळीं तो हॉस्पिटलांत होता. कमरेचा निर्जीव दगड झाला आहे हें त्याला तिथेंच कळलें. डोळ्यांची विटविट उघडझांप करीत तो पहात राहिला. कुठेंहि वेदना नव्हती. सारें अंग बधिर केलें गेलें आहे हें त्याला कळलें. पण लघवीच्या जागीं तीन इंची रबरी नळी बसवली आहे हें कळतांच तो पुन: फीट येऊन निचेष्ट पडला. पुन: शुद्धीवर आला तेव्हां तो मनानें मेलाच होता.

फॅक्टरींतून नुकसान भरपाई मिळेल अशी विविध प्रलोभनें त्याला दाखवण्यांत आलीं. प्रेताच्या कानांत गुणगुणावें तसें त्यानें सारें ऐकलें. पण त्याच्या मनाला थोडीशी सुद्धां धुगधुगी आली नाहीं. डोळ्यांत जीव नसल्या-सारखा तो टक टक बघत राहिला. कसलाहि विचारकरण्याची ताकद त्यांच्यांत राहिली नाहीं.

चाळींतलीं सारीं माणसें त्याला हॉस्पिटल-मध्यें येऊन भेटून गेलीं.

सर्वांचे चेहरे दु:खी झाले.

त्यांचे दु:खी चेहरे पाहून रंगाजीला कळवळल्यासारखें झालें. सर्वांची नित्य टर उडवून आपण त्यांना दु:ख दिलें याची त्याला प्रथमच जाणीव झाली.

चार महिन्यांनीं रंगा घरीं आला तो अक्षरश: मोडून गेल्यासारखा. तो विरून विरून विस-विशीत झाला होता. संथपणें तो गॅलरींतल्या वेताच्या खुर्चींत बसला. वेड्यासारखा वेडी-वांकडीं तोंडें करीत बोटांचीं नखें कुरतडूं लागला.

संध्याकाळीं चोपड्यांचें बंडल कुशींत धरून चंपू शाळेंतून आली. तिचा सांगाडा झाला होता. तिनें चावी लावून आपली खोली उघडली नसती तर ती चंपू हें त्यानें ओळखलेंसुद्धां नसतें. तिला पहातांच त्याला पराकाष्ठेचें दु:ख झालें. कांहीं न बोलतां खाल मानेनें ती खोलींत शिरली.

रंगाचा जीव कासावीस झाला. जोर-जोरानें त्यानें नखें चावलीं. मान वर उचलली नाहीं.

जगूअण्णा सैल कासेनें फिरत होते. अण्णाराव शेंडीची गांठ पक्की करून बसले होते. कमळाजी पावलें मोजून कपाळावर हात आपटत होता. बाकी सारें होतें तसेंच होतें. पण तीं माणसेंच आतां रंगाच्या नजरेंत येत नव्हतीं. चंपू खंगली, खलास झाली एवढेंच त्याच्या डोळ्यांना कळत होतें. .

अंधार पडत होता. त्या अंधारातून क्षीणशी सुकलेली कांठी पाय टाकत पुढें येत होती.

"कोण आहे ?"

"मी, शान्तू रे !"

"बैस !"

"जिवाला बरं नाहीं, रंगाजी ?"

"आतां बरं आहे ! कारखान्यांतल्या स्फोटांत सांपडलों होतों. आतां बरं आहे !"

"तुझ्यावाचून गमत नाहीं !"

"येईन अधून मधून. आतां मला चांगलं चालतां येतं !"

"म्हणत होतो– तूंच बैस दुकानांत–"

"आणि तूं ?"

"मी एकटा जाईन कुठं तरी तीर्थाला. संसार नाहीं झेपत..."

त्याच्या डोळ्यांतून नेहमींच पाणी झरायचें. पण आतां धारा लागल्या.

रंगाला कशाचाच कांहीं अर्थ कळेना.

तो वेड्यासारखा अंधान्तरींच पहात राहिला. त्याची मुंडी लोंबकळल्यासारखी दिसूं लागली.

लहानशी कळशी घेऊन चंपू नळावर जात होती.

तिनें दांताखालीं ओंठ चावला होता. डोळे कवच बसवल्यासारखें डबडबले होते.

"काय होणार आहे हिचं ?" तो स्वत:शींच म्हणाला.

शान्तू उठला आणि स्मशानाकडे निघाल्या-सारखा चालत राहिला.

हें काय चाललें आहे ?

उभ्या हयातींत केला नव्हता एवढा विचार करीत रंगा बिछान्यावर आडवा पडला. पटापट दारें बंद झालीं. कड्या लागल्या. आवाज त्यानें ऐकले.

काय होणार आहे ?

मध्यरात्रींपर्यंत तो सैरभैर मनानें विचार करीत राहिला.

चंपूच्या खोलीचं दार उघडल्याचा आवाज झाला. चंपू का येते आहे ?

छातीवर चिरा पडल्यासारखा त्याचा श्वास मंदावूं लागला. • • •

अनुक्रमणिका




चुरचुरीत, खुसखुशीत आणि खमंग फरसाण

## अपमान व विवेक

त्या काळीं इंग्लंडमध्यें मुळीं प्रथाच होती कीं सदा कमरेला तलवार बांधून हिंडायचं आणि द्वंद्व युद्धाला कुणी आमंत्रण दिलं तर तें स्वीकारून त्याच्याशीं दोन हात करायचे. असं न करणं हें तेव्हां म्याडपणाचं लक्षण समजलं जाई.

ह्या अशाच वेळीं, अगदीं पैज मारून, एका तरुणानं, महाराणी एलिझाबेथच्या सन्मानास पात्र झालेल्या सर वॉल्टर रॅलेला द्वंदयुद्धास आवाहन केलं. सर वॉल्टर ह्यांनीं जेव्हां त्याचं आमंत्रण नाकारलं, तेव्हां तो नवयुवक त्यांच्या तोंडावर थुंकला.

तलवार चालवण्यांत अत्यंत निपुण असलेल्या सर वॉल्टर रॅले ह्यांनीं झालेला हा आपला अपमान गिळून, अगदीं शांतपणे ते त्या तरुणाला म्हणाले, "बावा रे, ज्या सहजतेनं मी तुझी माझ्या तोंडावरील थुंकी रुमालानं पुसूं शकतो, त्या सहजतेनं, जर मी तुझ्या छातींत झालेल्या माझ्या तलवारीची जखम पुसूं शकत असतों किंवा विनाकारण झालेल्या नरहत्येच्या पापापासून बचाव करायचा कांहीं उपाय असता, तर मग निश्चित्च तुझ्याशीं मी तलवारीचें दोन हात खेळण्यास तयार झालों असतों."

❊ ❊ ❊

## पंजोबाची गांठ कुबेराशी



बँकेतील पैसे घ्यायच्या खिडकीजवळ बराच वेळ उभं राहून कंटाळलेल्या एका माणसाची गांठ, तिथंच एका मित्राशीं पडली, तेव्हां तो म्हणतो, "इथं असं उभं राहात असतांना मला माझ्या पणजोबांची आठवण येते."

"का वरं ?" मित्रानं पृच्छा केली.

"कारण, माझे पंणजोबा वारले तेव्हां स्वर्गांत त्यांची गांठ कुबेराशीं पडली. ते कुबेराला म्हणाले, 'बावा रे, तूं लाखों वर्षें इथला कोपाध्यक्ष आहेस.' कुबेर हंसून म्हणाला, 'खरं आहे बुवा तें. पण इथलं एक मिनिट म्हणजे दहा लाख वर्षें आणि दहा लाख रूपये म्हणजे एक पै.'

"माझ्या पणजोबांनीं कुबेराचं बोलणं ऐकलं तेव्हां ते म्हणाले, 'कुबेरा, मला तूं एक पै उसनी देतोस कां'?"

"'कां नाहीं ?' कुबेरानं उत्तर दिलं, 'जरूर देईन. पण त्यां करितां तुम्हांला एक मिनिटभर थांबावं लागेल.'"

❊ ❊ ❊

## चोर आणि वकील

वकील साहेबांनीं आपल्या अशिलाकडे गंमीरपणें पाहिलें.

"तूं गुन्हा केला नाहींस ना ?" ते म्हणाले. "ठीक आहे. मी जरूर तुझी केस हातांत घेईन. पण तूं मला सगळं सगळं व खरं सांगितलंस ना ?"

अशिलानं आवढा गिळला.

"पैसे कुठें लपवून ठेवले तेवढं सोडून बाकी सगळं सांगितलं साहेब."

❊ ❊ ❊

## मापाचा बोकड

एका गृहस्थाच्या घरीं मोठी मेजवानी होती. बोकडाचें मटण करावयाचें होतें. त्या गृहस्थाच्या बायकोनें गड्याला बोलावून बाजारांत जाऊन अमुक अमुक एवढ्या मापाचा बोकड घेऊन ये असें सांगितलें.

थोड्या वेळानें गडी परत आला. बाई साहेब दिवाणखान्यांत पाहुण्यांशीं गप्पा मारण्यांत रंगल्या होत्या. गडी आंत येऊन मोठ्यानें म्हणाला,

"बाई साहेब, अगदीं तुमच्या मापाचा बोकड आणला आहे."

## दहा रुपयांची वाढ



श्री. भडभडे आपल्या कारकुनी पेशाला पुरें कंटाळलें होतें. त्यांच्या इतर सहकार्यांनां वेळोवेळीं साहेबाला 'मस्का' लावल्याबद्दल, बा साहेबाची सिनेमाची तिकिटें काढल्याबद्दल, बा साहेबाला हातरुमाल विकत आणून दिल्याबद्दल, पगारांत 'नैमित्तिक' बढती मिळत असे. पण भडभड्यांनां हे कांहीं जमत नसल्यामुळें बढतीच्या कोष्टकानुसार त्यांना बढती मिळत असे. भडभडे मनांत म्हणत – 'हे कांहीं खरं नाहीं !' म्हणून एकें दिवशीं चांगला 'कर्त्याचा वार' शनिवार पाहून, साहेबाकडे गेले; व पगारांत दहा रुपये "नैमित्तिक' वाढ मागितली. पण साहेबानें त्यांना सबब सांगून बाहेर पिटाळलें. पण भडभड्यांनीं धीर सोडला नाहीं. ते दर महिन्यांत एकदां तरी साहेबाला भेटत. दर वेळीं साहेब सबब पुढें करींत. कधीं 'आयकर' वाढलेंत म्हणून कंपनीला तुम्हाला दहा रुपये देणें परवडत नाहीं, कधीं कंपनीचा खर्च वाढलाय, तर कधीं धंदा डबघाईस आहे, अशा नाना सबबी. पुढल्या महिन्यांत पगाराच्या दिवशीं दहा रुपयांची एक नोट घेऊन भडभडे तरातरा साहेब कडे गेले.

"आपण ह्याचा स्वीकार करावा." भडभडे ट साहेब.

"कां ?" साहेब ट भडभडे



अनुक्रमणिका

"कंपनीची हलाखीची स्थिति पाहून मला भडभडून आलं आहे." भडभडे 'एक्स-प्लेंड' "अशा स्थितींत वास्तविक पाहतां मीं दहा रुपयांची वाढ मागायला नको होती. आपण माझ्या पगारांतून ह्यापुढें दर महिन्याला दहा रुपये कांपावेंत. त्यामुळें वाढते आयकर, वाढता खर्च हे भागविण्यासाठीं कंपनीला तेवढीच मदत होईल. कराल नां एवढें?"

डोळे मिचकावीत साहेब म्हणाला, "मि. भडभडे, तुमची ही उदारता पाहून मला अगदीं गंहिवर आलाय. विशषत: तुमची कंपनी-वरील निष्ठा. अहाहा ! 'फाईन'. परंतु हे दहा रुपये तुमच्याजवळच राहूं द्या. तुमच्या ह्या दहा रुपयांमुळें कंपनीच्या अवाढव्य खर्चांत तसा कांहीं बदल घडून येणार नाहीं."

"अगदीं बरोबर" दहा रुपयांची नोट पुन्हां साहेबापुढें फेकीत भडभडे म्हणाले "म्हणनच मला दहा रुपये वाढ दिली तर त्यानेंहि कंपनीच्या अवाढव्य खर्चांत तसा कांहीं बदल घडून येणार नाहीं."

ती दहा रुपयांची नोट पुन्हां भडभडयांच्या हातांत कोंबीत साहेब म्हणाला, "राहूं द्या आणि हीच नैमित्तिक वाढ म्हणून हिचा स्वीकार करा, त्यामुळं आपण दोघेही खूष राहूं काय ?"

* * *

## काका, मला वाचवा हो !



ज्याचं सारं आयुष्य शहरांत गेलं आहे असा एक माणूस पहिल्यां दा च बोटीनं दुसऱ्या गांवीं जात होता. होडी अगदीं संथपणें पाण्यावरून चालली होती. त्या शहरी माणसाला साराच प्रकार नवीन होता. म्हणूनच मग विस्तीर्ण आकाशाकडं नजर टाकून, बोटींत दुसरं कुणीच नसल्यामुळं, त्यानं नावाड्यालाच विचारलं, "काय रे तुला नक्षत्र ओळखतां येतात का ?"

"नाहीं शेठ," नावाड्यानं उत्तर दिलं. "मला त्यांतलं तर कांहींच समजत नाहीं."

"अरे, अरे, मग तर तुझं $\frac{1}{4}$ आयुष्य फुकट गेलं, "तो शहरी म्हणाला.

कांहीं वेळानं त्या शहरी माणसानं पुन्हां नावाड्याला विचारलं, "बरं, तुला गणित तरी येतं."

"नाहीं शेठ," नावाड्यानं उत्तर दिलं. "मला तर शिक्षणाचं बोटहि लागलेलं नाहीं."

"अरे, अरे, मग तुझं $\frac{1}{2}$ आयुष्य फुकट घेतलं," तो शहरी उद्गारला.

होडी तशीच कांहीं वेळ पुढं जात राहिली आणि किनाऱ्याला असलेली झाडं पाहून त्या शहरी माणसानं परत त्या नावाड्याला प्रश्न केला, "निदान तुला वृक्ष-विज्ञान-शास्त्र माहिती असेल !"

"छे छे, शेठ मला कसलं शास्तर-बिस्तर कळणार !" नावाड्यानं पटकन् उत्तर दिलं.

"अरे, अरे, तर मग तुझं $\frac{3}{4}$ आयुष्य निव्वळ फुकट गेलं म्हणायचं," तो शहरी कळवळून म्हणाला.

आणि अशा रीतीनं ते पुढं जात असतांना एकाएकीं नदीवर वादळ उठलं, जोराचा वारा वाहूं लागला. होडी डगमगूं लागली, आणि बघतां बघतां तींत पाणी शिरलं. नावाड्यानं ओळखलं, आतां बोट बुडणार. म्हणून मग त्यानं पटकन् पाण्यांत उडी मारली, आणि पोहतां पोहतां आपल्या शहरी गिऱ्हाईकाला विचारलं, "शेठ, तुम्हांला पोहतां येत का?"

"नाहीं ना. नाहींतर तुझ्यासारखी पाण्यांत उडी मारली नसती कां?" अगदीं हतबल होऊन तो शहरी माणूस उद्गारला "आतां मला वाचवा हो. तूंच सांग मी काय करूं ते ?"

"शेठ, आतां बुडून मरण्याशिवाय दुसरा उपाय नाहीं, "त्या नावाड्यानं उत्तर दिलं." तुम्हीं सगळ्या विद्या शिकलां, पण पोहोणं शिकला नाहीं. त्यामुळंच आतां त्याविना आपल्या साऱ्या विद्या व्यर्थ ठरायची वेळ आली आहे. आतां एक करा, परमेश्वराची प्रार्थना करा. तोच तुम्हांला ह्यांतून वाचवील."

●●●



















● स्मृतिशिल्प ● पेरणी ● पोपटी चौकट

## महान कार्याचें मूल्यमापन

**कांहीं** कर्तृत्ववान माणसांची भरारी एवढी विलक्षण असते, कीं बरोबरीच्यांना बाजूला सारून, मागच्यांना मागें ढकलून व पुढच्यांना धक्का देऊन हीं माणसें मर्यादेच्या पल्याड हां हां म्हणतां जातात; बाकीच्यांना केवळ आ वासूनच त्यांच्याकडे पाहाण्यापलीकडे दुसरें कांहीं सुचत नाहीं. अशी 'कृतिपुरुष' माणसें एखाद्या जंगलांत देखील नंदनवन निर्माण करतात. आणि फार काळजीपूर्वक पाऊल टाकणाऱ्या बुद्धिजीवि माणसांचें तें यात्रेचें ठिकाणहि होतें.

### पर्व-सुकृत

आतां वस्तीराम शेठजींचेंच पाहाना ! मरुभूमींतून महाराष्ट्रांतल्या एका खेड्यांत येऊन चाळीस वर्षांपूर्वीं केवळ तीन कामगार घेऊन तत्कालांत क्षुल्लक समजल्या जाणाऱ्या विडी तयार करण्याच्या धंद्यांत त्यांनीं लक्ष घातलें आणि अनेक तापदायक उन्हाळे-पावसाळे, वारा-वादळें सहन करीत करीत ते प्रगती करीत राहिले. चाळीस वर्षांनंतर आज त्यांच्या मालकीचे आठ कारखाने आहेत आणि बारा हजारांच्या आसपास कामगार प्रतिदिनीं एक कोटीवर विडी तयार करीत आहेत. अशा अति-विशाल व्यापाला सहकारीहि उत्साही, त्यागी व एकनिष्ठ मिळणें हें पूर्व-सुकृतानेंच होऊं शकतें. वस्तीराम शेठजींचें भाग्य असें, कीं त्यांना लाभलेले सहकारी हे त्यांच्याप्रमाणेंच नौतिक तेजोवलय असलेले. शेठ नरसिंगदास शंकरलाल चांडक व शेठ रामनाथ शंकरलाल चांडक हे दोन बंधू म्हणजे वस्तीरामजींच्या उंट छाप विडी-उद्योग-समूहाचे आधारस्तंभच.

या तीन उद्योगमूर्तींनीं गेल्या चाळीस वर्षांत आपल्या हजारों सहकाऱ्यांसमवेत गाजविलेल्या कारकीर्दीच्या इतिहासाचें सिंहावलोकन करणारा जो एक लहानसाच अभिनंदन ग्रंथ त्यांच्या हितचिंतकांनीं प्रसिद्धिलेला आहे त्याचें नांव 'स्मृति शिल्प'. या स्मृति-शिल्पांत पहिलीं बारा पानें शेठ वस्तीरामजी आणि त्यांच्या उद्योग समूहाची रोमहर्षक माहिती दिलेली असून एखाद्या सुंदर लघुकथेसारखी ती शेवटपर्यंत वाचनीय आहे. उंच ध्येयें साध्य करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्यांना हा छोटासाच परिचय दीपस्तंभासारखा आहे. प्रपंच आणि परमार्थ यांचा सुरेख संगम पहायचा असेल, 'प्रयत्नांति परमेश्वर' या उक्तीची प्रचीति पाहायची असेल, दीर्घोद्योगी आणि धनपति असूनहि अत्यंत सोज्वळ माणसें पहायचीं असेल तर सिन्नरच्या या ग्रंथांतील चरित्रनायकांना पाहिलेंच पाहिजे.

### कांहीं आठवणी

या ग्रंथांत प्रा. शं. वा. दांडेकर, देगलूरचे श्री. धुंडा महाराज, श्री. करवा या श्रेष्ठांचे आशिर्वाद आहेत. आलमगीरचे संपादक व एक जाणते पत्रकार श्री. चं. वि. बावडेकर यांचें विडी महात्म्यावर सुरेख प्रवचन आहे. श्री. वसंतराव नाईक, श्री. मालपाठक, वैशंपायन, देवचंद शहा इत्यादि मान्यवरांचे लहान लहान अभिनंदनपर लेख व विडी धंद्यांतील कर्तबगार लोकांचीं मतें व हितचिंतकांच्या आठवणी असे हिंदींत, गुजरातींत व इंग्रजींत पांच विभाग आहेत.

### रास्त शंका

'रॅशनल आर्ट प्रेस' या नामवंत संस्थेनें या ग्रंथाची छपाई उत्तमप्रकारें केलेली आहे. ग्रंथ प्रसंगोपात अवधान राखून सचित्र केलेला असून तो प्रेक्षणीयहि झालेला आहे. या ग्रंथांतील कांहीं गोष्टी मात्र खटकतात ग्रंथाच्या आवरणावरील शीर्षकांत 'स्मृति' हा शब्द दीर्घाकार कां झाला कळत नाहीं. नव्या लिपीप्रमाणें तो मुद्दाम तसा ठेवला असेल काय? तरीहि शिल्पाची जोड असल्यावर पहिला शब्द व्याकरण दृष्ट्या ऱ्हस्वाकारच लिहिण्याची पद्धत रूढ आहे.

( **स्मृति शिल्प**—वस्तीराम नारायणदास महेश्वरी, सिन्नर; भारतांतील यशस्वी विडी उद्योगाचा परिचय. )

—गोपालन्.

● ● ●

## नव्या उमेदीची जिद्द

**'पेरणी'** हा श्री. रा. रं. बोराडेचांचा एक ग्रामीण कथासंग्रह. संग्रहांत एकंदर चौदा कथा असून त्या सर्व विविध मराठी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. ह्यांतील कथा शहरांतल्या रंगेल वातावरणापासून अगदीं दूर जाऊन मराठवाड्याच्या मातींत लोळतात, तिथल्या वातावरणांत रंगून जातात आणि ग्रामीण भाषेंत आपल्याशींच हितगूज करतात. तिथल्या सुखदुःखाच्या गूजगोष्टी करतात आणि जीवनांतल्या एका नेहमींच्या वळणाकडे वळतात. आतां हेच पहा ना.—

"काई दुखाया खुपाया लागलं का ?"

"व्हय"

"काय दुखायलय ?"

"डोस्क"

"आवं, आसं काय बसलांत मंग. यावं; जरा दाबून देते."

आणि मग तो विचार करून म्हणतो—

"यंदा सुमीदराचं उरकावं लागल न्हाई?"

"तर वं. यंदा ठिवायची नाही तिला"

"काल एका जागचा पत्ता आलाय"

अशीं जिव्हाळ्यानें बोलत, सुखदुःख विचारीत लेखकाची शैली एकदम लग्नाच्या सुखद् विषयाला हात घालते. संग्रहांतील शेवटच्या पण पुस्तकालाच नांव दिलेल्या 'पेरणी' या कथेंतील ही भाषा. भाषा खेळकर असली तरी कथा मात्र जीवनांतल्या भविष्यांतीत सुखस्वप्नाच्या आणि स्वार्थीपणाच्या चक्रव्यूहांत भरकटणारी. तशी ही कथा प्रभाव पाडणारी आहे.









अनुक्रमणिका

वहिणीला माहेरी आणण्यासाठीं भावापासून तो आईबापापर्यंत सर्वांची शिकस्त चाललेली असते. सासुरवाडीहून वहिणीची पाठवणी होणार नाहीं म्हणून दिना व यशवंता तिला पळवून आणण्याच्याच अविचारांत राहतात. पोरांच्या पाठीमागें निघालेला आवा मात्र मध्येंच घुळींत पाय खुपसून वसतो. 'पीक' या कथेंतील विचार अविचारांच्या काहूलींत मात्र आबा पूर्ण विचारी वाटतो. 'खानदान' ही कथा मात्र लेखकाच्या लेखणीचें कसब म्हणावें लागेल. लग्नाच्या वोहल्यावर मुलीला चढवतांना आपल्या मुलीच्या चारित्र्यशोभेवर प्रत्यक्ष तिच्या भावी वराकडूनच गरळ ओकल्यावरसुद्धां बापूसाहेब निमूटपणें सहन करतात. तर प्रत्यक्ष नवऱ्यामुलाला नकार देवून तोंडघशी पाडणारी नववधू कमा व तिचा भाऊ नव्या उमेदीचे वाटतात. लेखकानें या व्यक्तिरेखा नवीन रक्ताच्या ध्येयवादानें रंगविल्या आहेत. उज्वल प्रतिभेची ही कथा वाचकांना अक्षरशः मोह पाडते.

ग्रामीण विनोदसुद्धा आगळाच असतो. त्याची कल्पना सहसा आपल्याला नसते. श्री. वोराडयांनीं सुद्धां असाच विनोद आपल्या कांहीं कथांतून चांगला रंगवला आहे. 'हुरडा,' 'मल्या घरचे पाहुणे' आणि 'काय सुद्धा राह्यलं नाय' या कथा खेळकर आहेत. कदाचित् चावट सुद्धा वाटतील पण खेडयांतल्या रंगेल जीवनाची प्रचिति घडविणाऱ्या आहेत. 'काय सुद्धा राह्यलं नाय' या कथेंतील लेखकानें एक गर्भित गुप्तार्थ मात्र वाचकांच्या डोक्याला चालना देण्यासाठीं गुप्तच ठेवला आहे. हा लेखकाच्या निवेदनांतील चाणाक्षपणाच म्हणावा लागेल.

या संग्रहांतील इतर कथाहि चांगल्या आहेत. 'चांगल्या' ह्याचा अर्थ वाचकांशीं अभिप्रेत आहे. ज्या कथा वाचकांच्या भावनेशीं समरस होतात, जिथें वाचकांची सुखदुःखें लेखकाच्या भावविश्वाशीं एकरूप होतात, त्यांना चांगलं नको का म्हणायला ? अशाच पैकीं 'सत्यानाश' ही एक कथा. खुद्द लेखकाच्याच वाडयांत हीं जन्म घेतें. मुक्या जनावराची अमानुषी हत्या आणि घरांतल्या लोकांना झालेल्या असह्य वेदना, ह्याचं वास्तव रेखाटन लेखकाने केलं आहे. त्यामुळें कथा हृदय हेलावून सोडते.

श्री. रा. रं. बोराडयांची लेखन शैली रंजक आहे. भाषेंत गोडवा तर आहेच आहे. पण कथा रंगविण्यांतहि एक नवी उमेद आहे. त्यांच्या कथेंत कलात्मकता आहे. परंतु त्यांच्या कांहीं कथा अगदीं शेवटी शेवटी रंग भरतात. कथा आता संपणार तशांतच त्यांची कथा खऱ्या अर्थानें रंगते. वाचकांची जिद्द भरीस लागणार तेवढयांतच त्यांची कथा पण संपते व वाचकांना अतृप्त ठेवूनच पुढची कथा वाचण्यास भाग पाडते. ह्याचं प्रत्यंतर 'वलामत' या कथेंत आल्याशिवाय राहत नाहीं. वाचकांना अतृप्त ठेवूनच गोडी लावण्याचा हा प्रयत्न वहुधा लेखकाच्या शैलीचा एक भाग असूं शकेल.

नव्या उमेदीनें, जिद्दीनें आणि ध्येयवादानें प्रेरीत झालेल्या श्री. वोराडयांचा हा 'पेरणी' कथासंग्रह ग्रामीण कथासाहित्यांत नवीन अपेक्षा निर्माण केल्याशिवाय राहात नाही. मराठवाडयांतली ही 'पेरणी' वाऱ्यावर डोलणारें डौलदार पीक निर्माण करील, यांत शंका नाही.

(**पेरणी** :– ले. **रा. रं. बोराडे**,
प्रकाशक–कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणें
मूल्य– ३–५० रु.)

**—मधुकर कोसारे**

●●●

## नवखेपणांतील सुजाणता

**विद्याधर** पुंडलीकांचा हा पहिला कथासंग्रह. पण पहिलेंपणाची खूणहि त्यांत सांपडत नाहीं. मोजके लिहिणाऱ्या लेखकांत पुंडलिकांना अग्रस्थान द्यावें लागेल.

'आजी शरण येते' ही पहिली कथा. निवेदक ह्या आजीचा नातू आहे. आजोवांच्या शूरपणावर त्याची नितांत श्रद्धा आहे. त्यांचा चक्रमपणा, त्यांचा संताप हें त्याच्या मनांतलें खास जपून ठेवण्याजोगें विशेष आहेत. त्यांतहि श्रीखंडापुढें मऊ येणारे आजोवा आणि गणितापुढें शरणांगति पत्करून 'गोष्टी'ची आर्जवें करणारा 'मी' अशा वेगवेगळया वयाच्या जोडया निवडल्यानें कथेची खुमारी अधिक वाढली आहे. घरगुती मांडण आणि खेळकर शैली ह्यांचा यशस्वी समन्वय ह्या कथेंत पुंडलिकांनीं साधला आहे.

'सावली, एका मांजरीची कथा, वार्ड नंबर सात, डोळे व ठिपका' ह्या कथा एक गहिरें दुःख घेऊन उभ्या राहतात. सावली ही एक वेगळया वातावरणांतील कथा आहे. आपल्या कॉलेजविश्वांत गाजलेल्या, पण परिस्थितीपुढें घांवण्यांत, लिखाणांत अपेशी ठरलेल्या एका भावनाप्रधान, हळव्या आणि कलावादी तरुणाची ही कथा, त्यांतील तो अपेशी लेखक अजय आणि त्याचें दुःख, त्याची जखम कुलंगी कुत्र्याप्रमाणें चाटावेसें वाटणारी, त्याची पत्नी सुधा आणि त्या लेखकाचें दारिन्द्य, लिखाणांतील कच्चेपणा रोखठोक दाखविणारा, 'वुलंद अरबी अमीरासारखा लालबुंद चेहरा असलेला' वडा लेखक ह्या व्यक्ति स्मरणांत राहतात. 'एका मांजरीची कथा, हिचा म्हटला तर विषय जुना आहे; पण त्यांतील भावविश्व सतत नवें आहे. मुलें न जगण्याचें विधिलिखित असलेलें जोडपें कृष्णाबाई आणि गोपाळराव. त्यांतहि कॅन्सरच्या असाध्य रोगानें झिजत असलेले पण वायकोच्या व्यथेची खपली अधिक निघूं नये म्हणून तिच्यापासून ती गोष्ट लपविणारें, गोपाळराव आणि विठ्ठल, रघु, तारा, मधु हीं पाठोपाठ गेलेलीं मुलें त्यांच्या अकाल मृत्युनें कृष्णाबाईची विकल मनोवृत्ति, अखेर मंजी मांजरीची तरी पोरें वांचतील कीं नाहीं? ह्या शंकेत त्यांनीं हळूवार पण प्रभावीपणें रेखाटली आहे. मनोविश्लेषणाची कसरत करूनहि पुंडलिकांनीं कथा यशस्वी चित्रित केली आहे. 'वॉर्ड नंबर सात' मध्यें मृत्युच्या पाठशिवणीचा अजब खेळ आहे. ज्यांनी मृत्यूला सामोरें जावें अशा वयाच्या नानांना चुकवून सर्व वार्डाला लळा लावणाऱ्या, वालसुलभ प्रश्नांनीं नानांना भंडावून सोडणाऱ्या आणि हॉस्पिटलच्या वातावरणांत रूसवाफुगवा दाखविणाऱ्या विनूला शेवटीं तो पकडतो. ऑपरेशनच्या गुंगींतून विनू हांका मारतो असा भास होत सावध होणाऱ्या नानांना विनूच्या कॉटवर हसमसून रडणारी त्याची आई आणि पांढरी चौकट दिसते, हें सारे प्रसंग हेलावून सोडतात. 'डोळे' आणि 'ठिपका' ह्या एका परीनें समस्या प्रधान कथा आहेत. दोहोंचे विषयबीज एकच आहे.










त्यांनीं आकार मात्र वेगळा धारण केला एवढेंच. 'ठिपका' मध्यें लवकर संतती नको म्हणून अॅबॉर्शन गुपचूप करण्यासाठीं निघालेलें जोडपें आहे. तर 'डोळे' मध्यें अॅबॉर्शनचा प्रयत्न करूनहि झालेलें वेडसर मूल नंदू, त्याचे मकास डोळे, त्याला येणाऱ्या जीवघेण्या फीट्स आणि त्यांतून त्याची आणि पर्यायानें स्वत:ची सुटका करून घेऊं इच्छिणारा त्याचा पिता, त्याच्या मनांत उद्‌भवलेलें 'पांढरा खून' करण्याचे अघोरी विचार अशी हीं सांखळी आहे. जन्माच्या आधी नंदूला घडलेलें मृत्यूचें दर्शन आणि त्यामुळें ओसाडलेले डोळे मनांत भिनत असतात. ही कथा आधी वाचली जाते आणि पुढें येणारी 'ठिपका' वाचत असतांनांच ह्या कथेचा पार्श्व नुसता अस्वस्थ करून सोडतो.

पुंडलिकांच्या कथांतील दु:ख त्या व्यक्ती-पुरतें मर्यादित तर आहेच पण तें व्यापकहि आहे. अ:स्वस्थ करून सोडणारें आहे. व्यक्ती पुसून जातात आणि दु:ख तेवढें वेगानें बाणासारखें खुपत राहतें. पुंडलिकांच्या प्रभावी शैलीचें हें यश अपूर्व आहे. व्यक्तीच्या ऐवजीं त्यांची व्यथा ही 'शाश्वत' बनते. आणि ही शाश्वतता हाच ललित लेखनांतील यशाचा मोठा पाया असतो.

'पोपटी चौकट' आणि 'चकवा' ह्या दोन उत्कृष्ट प्रीतिकथा आहेत. मिष्किल आणि प्रसन्न भाषाशैली अणि त्यांतील संवाद ह्यांनी ह्या कथांना उठाव दिला असल्यानें वाचकांना तव्येत खुश होते.

'सामोरी' ही मराठी कथाविश्वांतील एक अनोखी कथा म्हणावी लागेल. मराठी संस्कारांत, घरांत वाढलेली मुलगी, हॉकीच्या मॅचमध्यें पांगळा झालेला आणि "प्रयोग-शाळेंत चतकोर कागदावर टांचणी खुपसून एकादा किडा टोंचून ठेवावा तसें चार फूट रूंद व सहा फूट लांब अशा एका पलंगावर जिवितानें त्याला टोंचून ठेवलें होतें." असा मधू ह्या दोन तरुणांच्या परस्पर अनुरक्तीचा ह्यांत निकोप आविष्कार आहे. अनूला 'सगळीच्या सगळी पाहणें' ह्या मनीषेला अनूकडून रूकार मिळतो आणि 'फुलझाडानें सूर्यकिरणाला सामोरें जावें तशी' ती त्याला सामोरी होते. हा उत्कट प्रसंग वाचतांना श्री. विश्राम बेडेकर ह्यांच्या 'रणांगण' ह्या उत्कृष्ट कादंबरींतील कथानायक चक्रधर उर्फ बॉब व हार्टी ही जोडी हटकून आठवल्या-खेरीज राहात नाहीं. अनेक न पेलतां येणारे अनुभव पेलणें हें पुंडलीकांचे 'सामोरी' ह्या कथेंतलें अपूर्व यश आहे. नाहींतर असा प्रसंग एवढेंच भांडवल घेऊन त्या कथेचा तोल बिघडण्याचीच जास्त शक्यता होती आणि अश्लिलता वाचकांना एक नवें खाद्य मिळालें असतें.

फॅन्टॅस्टिक आणि तांबूस तपकिरी नारिंगी इतर कथांच्या मानानें तोकड्या पडतात. फिक्या वाटतात.

निष्ठेनें लिहिणें आणि कमी पण चांगलें लिहिणें हा पुंडलिकांचा स्वभाव आहे. अति-नाट्य, अतिवास्तवता ह्यांच्यावर त्यांचा कटाक्ष असल्यामुळें त्याची निर्मिति ही एका सुजाण व समृद्ध भावविश्वांतून आकारास येते आणि म्हणून 'पोपटी चौकट' हा संग्रह पहिला असून 'पहिलेपणा' अंशत:हि प्रकट करीत नाहीं.

(**पोपटी चौकट** : ले.–विद्याधर पुंडलीक, प्रकाशक :–मौज प्रकाशन, पृष्ठें १६३, कि. रु. ५–५०)

—**केशव मेश्राम**



अनुक्रमणिका



*प्रत्येक महिन्यांत घडणाऱ्या अनेक सामाजिक, राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक, साहित्यिक इत्यादि महत्त्वपूर्ण पण रजक व गंभीर घडामोडींचें खुमासदार तितकेच मार्मिक समालोचन करणारे हें नवें सदर....*

# गीतार-हास्य

—अजबराव

‘**अजब** है किस्मत की जादूगरी.’

‘किस्मतसे खेलो, किस्मत है खिलौना.’

‘क्काय ?’ वाळोबांनी तोंडाचा बुडकुला करुन विचारलं.

‘मला तरी काय माहित तुमचा कसला गुह्यार्थ आहे तो ? राष्ट्रभाषेंत आपलं बोलणं झालं . . . गुह्यार्थ मला ...’

‘गुह्यार्थ ? अरे अजबराव हा मुक्तार्थ आहे. किती उघड सांगू ? अरे वाट लागली.’

‘कुणाची ?’

‘तुझी, माझी, देशाची, जगाची’

‘वाळोबा, असं कांहीं नवकाव्यांत बोलूं नका. साग्रं आपलं जनाबाईच्या ओवींत सांगा.’

‘अजबराव, माझी थेरडेपणाची वाटचाल असली तरी नव्याशी माझा टच् असतो शॉक मला बसतो ही गोष्ट सोड. माझी बदनामी मला नाही आवडणार. तसा मी बडा नामी आहे. बाळाजीपंत उर्फ बळवंतराव उर्फ वाळोबा विसाजीपंत उर्फ दादासाहेब उर्फ बांबूवाले कुळकर्णी चिकोडीकर. म्हणजेच हिशेबांत चिरंजीव कोडी करणारे’.

‘बापरे दम लागला मला ऐकतां ऐकतां. पण यापेक्षां वाळोबा बांबूवाले चिकोडीकर चालेल. इतिहासकारांत कांहीं दोन व्यक्ति असल्याची डोकेफोड होणार नाही कीं तुमच्या कर्तृत्वाचे मूल्यमापनहि कमी होणार नाही.’

‘अजबराव, तेवढा तूं माझ्यासारखा द्रष्टा नाही. अरे हे ॲटमजेट युग ओळखून मीच त्र्याक्षरी झालो. वाळोबा. काय ?’

‘बाकी पंचाक्षऱ्याचासुद्धां तुमच्यापुढें कांहीं पाड नाही हें खरं’

‘कसं बोललास. असं शहाण्यासारखं बोलावं. अरे केनेडीसुद्धां त्र्याक्षरी.’

‘ओ ऽ ऽ आतां तुमचा मुक्तार्थ घ्यानांत आला.’ मी हंसलो. पण माझ्या हंसण्यानं वाळोबा भडकले.

‘अरे हंसतोस काय रव्यॅं....रव्यॅं ? जगाचे भवितव्य पुन्हा काळे झाले. पोलादी पुरुषांचा पोलादी पुरुष गेला. केनेडींचा स्वतःचा कणा मोडलेला होता पण त्यांनी स्वतंत्र जगाचा कणा ताठ केला. मी जर डलासला असतो तर ओस्वाल्डच्या बंदुकीच्या दुर्बिणीवरची कांचच फोडली असती धोंड्यानं.’

‘महाराष्ट्रांतलें तुम्हीं तेव्हां धोंड्याशी तुमचा संबंध खराच.’

‘मग ? खोटा कीं काय ? अरे इकडे चिनी च्याव च्याव करीत होते त्यावेळीं सारे जग क्यूबापाशीं विनाशाच्या टोकावर उभे होते. पण केनेडींनी दंड थोपटल्याबरोबर क्यूबांतली मिझाइल्स घेऊन ख्रुशॉव्हनं पलायन केलं लोखंडी पडद्याआड. केवढे आकाशएवढे केनेडी. पण त्या बरटरांडनं शांतीच्या नांवानं केनेडींना धमकी दिली तर ख्रुशॉव्हला हात पाय जोडून विनवणी केली. आहे कीं नाहीं भोंदूगिरी ?

‘आहे खरी. पण बरटरांड काय ?

‘रसेल रसेल. त्यांनी मात्र आमच्या मथुराचं मुत्रा करावं ठाणाचं थाना करावं ? आम्हीहि त्यांच्या नांवांचे उच्चार येतील तसें करुं. बोल यावर काय बोलायचंय तुला ?’

‘नाही, तुम्हींच बोलताय हें ठीक आहे.’





अनुक्रमणिका

'म्हणूनच माझ्यासारखा त्र्याक्षरी काय वोलतोय हें अैकून घे. लोकशाहींत गरीबाची शान करणारे कन्नमवार फटकन गेले, पांच जनरल गेले, य. गो. गेले, चिं. वि. गेले, शेजवलकर गेले, पणीक्कर गेले, साबू गेला, म्हणून म्हणतो वाट लागली, फ्रान्सच्या खुराडयांत आरवला कोंवडा, रशियाच्या क्षितिजावर झुंजूमुंजू झाले, तरी, नाही रे उजाडत. . . .'

'कुठून कुठें काय वोलताय वाळोवा ?'

'हा संज्ञा प्रवाह, तूं बंद ठेव नि अैक.' अरे माझी पिळवटलेली आंतडी म्हणतात, 'मृत्यूने अगदी हैदोस घातला आहे. इथल्या साखरेसारखीं देवाकडेसुद्धां चांगल्या माणसांची टंचाई एकदम झालेली दिसतेय.'

'पण वाळोवा, मृत्यूला एवढे घावरायचं कसलं ? मृत्यू एकदांच सफा करतो. पण चांगल्या आदर्शांना ठायी ठायी चुरडणाऱ्या या आयुष्यापुढं आपण वेडरपणे उभं राहिलं पाहिजे. केनेडींच्या सारखं.'

'वाव्या, वाव्या, वाव्या, हार आण, अजवरावांच्या गळयांत घालूं दे ' वाळोवांनी औरसपुत्राला पुकारा केला.

मी म्हटले, 'माझ्या गळयांत नव्हे, अर्वा हार तुमच्या गळयांत नि अर्वा हार वाव्याच्या गळयांत घालायला हवा.'

'हा काय सत्कार ?'

'तुम्ही केनेडी या नांवाचा नुसता पोकळ उदोउदो करतां म्हणून आणि वाव्यानं त्यांची सुटी सिनेमा पहाण्यांत सत्कारणी लावली म्हणून.'

'अजवराव, तूं आमचा घोर अपमान केला. मी वाव्याचे केवढे लाड करतो, मी डॉक्टर झालो नाही तरी त्यानें डॉक्टर व्हावे . . . छे छे . . . छे छे . . . नाही सहन करवत . . .'

. . . आणि दुःखातिरेक झाल्याने वाळोवा त्यांच्या खोलींत गेले. माझें विचार माझ्या खोलीभर झालें. मीच त्यांत पिग्मी झालो. उघडया रस्त्यावर आलं कीं असे वाळोवा नि असे वाव्या कितीतरी भेटतात. वाळोवापेक्षां मला वाव्याची च्रीड आली.

मी विचारलं, 'काय वाव्या, कुठं गेला होतास ?

वाव्यानं खिशावाहेर ठेवलेलं काळया चष्म्याचं एक तंगडं हालवित देव आनंदच्या स्टायलींत उत्तर केलं, 'फिर वही दिल लाया हूं. पण तुमसा नही देखाची सर नाही. आशा पारेख आहे खरी फटाकडी. अहो फुकटची सुटी मिळाली. उद्यांहि आहे. परवा मिळते काय वघतो.'

वाव्याच्या टाळक्यांत एखादा फिफ्टी मेगॅटन फटाका लावावसं वाटलं मला. केनेडी सारख्यांच्या मृत्यूच्या सुटीला आपल्याला काय मोल द्यावे लागते याची या अशा भिडूंना जाणच नसते. केनेडी गेलें, स्वतंत्र जगाचा त्राता गेला पण भारताचा मित्र गेला. कम्युनिझमला विशिष्ट उपायांनी थोपविण्याच्या पद्धतीवर आतां अमेरिकी परराष्ट्रनीतीकडून परिणाम होईलच पण अविकसित देशांना अमेरिकेकडून मिळणाऱ्या मदतीवर फार मोठा परिणाम होईल. सिनेटर पासमनसारखें लोक आतां उचल खाल्लयाशिवाय रहाणार नाहीत. अमेरिकेतील केप कॅन्वेरल आतां केप केनेडी झाले आहे, न्यूयॉर्कचा इडलविल्ड आंतरराष्ट्रीय विमानतळ आतां केनेडी अेरोड्रम होणार आहे. हे ठीक. पण अेक नवा तारा अमेरिकेने शोधला आहे. त्याचं वारसं केनेडी या नांवानं करणं उचित होईल. केनेडींच्या यशांत जॅकेलिनच्या लावण्याचा पन्नास टक्के भाग होता असा देशोदेशींच्या राजधान्यांतूनसुद्धां गवगवा झालेला आहे. असेलहि; पण तेवढयानं हें आणखी एक प्रोफाइल इन करेज फिकं, ढिलं पडणार आहे थोडंच ? हे प्रोफाइल इन करेज अस्वस्थ झालं म्हणून तर प्रा. वारघूर्न–रशियाचा लोखंडी पडदा फाडून अमेरिकेला पोचूं शकले.

पण मित्रा, ठाणेकरांच्या आनंदावर जंगी पडदा पडला. कधीं नव्हे तो त्यांनी महोत्सवी क्रिकेट सामना योजला. पण केनेडी कन्नमवारांच्या इहलोक सोडण्यांत ठाणेकरांची सलामीची जोडी डकलाच दांडीचित झाली.● पुढें सगळा● खेळच गडगडून बंद झाला. त्यांच्या दुःखांत अजवराव सहभागी आहे. ठाणेकरांनी चिकाटी सोडू नये. फिरून प्रयत्न करावा. ज्या करतां ठाण्याची प्रसिद्धी आहे तें कारण आता खुद्द मुंबईलाच चिकटलेलं आहे. 'ठाण्याला पाठवा' असं म्हणण्यापेक्षां आतां 'मुंबईला पाठवा ' असं म्हणायला हवं. त्या दिवशीं संध्याकाळीं मासुंदा तलावाजवळील जांभळी नाक्यावर फार चर्चा झाली. . . कंवरडयांत लाथ घालून या क्रिकेट खेळाला ब्रिटिश वेटांत हांकलायला हवा. हा खर्चिक खेळ आहे, हा खेळ नसून खेळाचा शो आहे. हे सारं म्हणणाऱ्यांची मला कींव येते. असं म्हटलं तर पॅंट ब्रिटिशांची आहे, शर्ट ब्रिटिशांचा आहे, वूट ब्रिटिशांचा आहे, या सगळं सोडून. धोतरवाला लंगोटीवाला कितीहि सुधारक विचारांचा असला तरी तो सूटावुटांत नसतो म्हणून रानटी असा एक सोइस्कर समाज आहे. ब्रिटिश गेले तरी त्यांनी चार चांगल्या गोष्टी मागे ठेवल्या आहेत. कायदा, शेक्सपीअर, इंग्रजी भाषा व क्रिकेट, चढाई, वचाव, समूह जाण, सहकार्य, सहिष्णुता, वैयक्तिक जिद्द नि वयं पंचाविंकं शतं . . . हें सारं आपल्याला फक्त क्रिकेट या खेळांतच मिळतं. राष्ट्रीय संरक्षण निधीसाठीं नट नि नटया या नव्यांना जे जमलं नाही तें क्रिकेटनं साधलं.

ब्रिटिशांनी भारतावर दीडशे वर्षे राज्य केलं त्यांत त्यांची जशी अक्कलहुशारी होती तसाच भारतीयांचा मूर्खपणाहि कारणीभूत होताच. नकली नि पोकळ राष्ट्रवादाच्या आहारी जाण्यांत हंशील नाही. आपल्या घटनेनं जर देशोदेशींचं चांगलं उचललं आहे तर आपल्या राष्ट्रवादानं तसं खुराक घेऊन स्वत्व टिकवण्यासाठीं शक्तिमान कां होऊं नये ?

आमच्या वाळोवांना क्रिकेट म्हणजे मूर्खांचं नंदनवन वाटतं. ते शहाणे आहेत, असोंत विचारे. पण त्यांचा वाव्या, क्रिकेटचा पट्टीचा शोकिन. रेसच्या वेडापेक्षां क्रिकेटचं वेड फार चांगलं. टांचावर उभा राहून वाव्या मला म्हणाला, 'आय ला, रमेश नागदेवनं नावाद चारशे सत्तावीस रन्स ठोकल्या. साला त्याला मुंबयच्या टेस्टमध्ये

अनुक्रमणिका

खेळवला पायजे.' या बाबतींतला बाब्याचा उत्साह नांवाजण्यासारखा आहे.

मी त्याला सांगितलं, 'रमाकांत देसाई लिट्ल टायगर आहे तर रमेश नागदेव आतां लिट्ल लायन.'

'आय ला, ग्रँड आयडिया. स्पोर्टला पत्र लिहितो.' अक्षरशः टिर्‍या बडवून बाब्यानं आनंद व्यक्त केला.

पण हे लिट्ल टायगर नि लिट्ल लायन, टायगर नि लायन कधीं होणार ? ते होत नाहीत याचं कारण क्रिकेट म्हणजे कॉलेजांतला खेळ असा सार्वत्रिक भ्रम; इतकंच काय कॉलेजांत गेल्याशिवाय क्रिकेट खेळणं जमणार नाही, क्रिकेट खेळणं ठीक नाही हा पोरभ्रम. परागतीचं या भ्रमांतच पाणी मुरतंय. हा भ्रम दूर 'झालाच पाहिजे' या आणि बर्‍याच बाबतींत भारतानं चर्चा बाराखडी पाठ करणं हितावह आहे. जेव्हां परळचा दणकट कामगारसुद्धां दणकेबाज गोलंदाजी करुं लागेल तेव्हां आपोआपच टायगर निर्माण होईल नि भारतीय क्रिकेटचा आब वाढेल. कामगार, शेतकरी, मजूर सगळे प्रवाह यांत आले पाहिजेत. क्रिकेटचा नि पदवीशिक्षणाचा कांहीहि संबंध नाही हें ध्यानांत घेऊन क्रिकेट कंट्रोल बोर्डानं या बाबतींत अधिकारी हालचाल केली पाहिजे. वेस्ट इंडीज, ऑस्ट्रेलिया, इंग्लंड येथील अशा अनुभवाच्या क्रिकंबोन मागोवा घेतला पाहिजे. हा भारतांत विखुरलेला 'स्टॅमिना' शोधून त्याला 'आर्ट'ची जोड दिली तर भारतीय क्रिकेटची विकेट कधीं उडणार नाही.

एक दिवस बाळोबांनी मला चाळीच्या जिन्यावरच गांठलं, म्हणाले, 'अजवराव, नंदांची विकेट उडणार !'

मी आपलं झटकन विचारलं, 'म्हणजे नंदाचं लग्न ठरलं कीं काय ?'

बाळोबा डाफरलेच, 'अरे नटी नंदा नव्हे, मंत्री नंदा.'

'मला वाटलं ऽऽऽ'

'नाही नाही, तुला वाटाचंच. तुझं तें वाटण्याचंच वय आहे.'

'काय वाटायचं ?

'सांगितलं असतं पण जनाची नाही तरी मला मनाची लाज आहे. ऐकलंस ? अरे दोन वर्षांत नंदा लांच लुचपत घालवणार, सगळीकडे शुध्दी होणार, आनंदी आनंद.'

'काय नंदालाच लुचपत घालवणार ?'

'होय की. पेपर सांगतायत. म्हणे दिल्ली सरकारनं शेणमूत्रासाठीं जंगी ऑर्डर दिलेय ?

'अहो त्या साठींसुद्धां परवाने असतील.'

'नाही रे फॉरेनचं शेणमूत्र नाही, आपलं देशीच वापरणार आहेत म्हणे गुजरातच्या आय्. जी. नगरवालाला पकडलं कीं.'

'पण नेहरूंची पाठ भलतीच रुंद आहे. कैरों, मालवीय, मेनन, शंकर सारखी सहस्त्र धेंडं पाठीमागे मावतील.'

'नेहरूंची पाठ म्हणजे काय गोवीचे वाळवंट आहे ? पसरलेय आपली म्हणायला.

'बाळोबा, ऑल मेन आर इक्वल अँड सम् मेन आर मोअर इक्वल हे जें ॲनिमल फार्म या कादंबरीतलं गणित आहे ना तेंच इथं लागू पडतं. सरकार टेहेळेपण नेमणार आहे. म्हणून तर आपल्या क्रांतीपुत्र नेहरुंनी लगेच खुलासा केला आहे..'

'कोणता रे ?'

"लांचलुचपत वरच्या पातळीवर नाहीं, लांचलुचपत खालच्या पातळीवर आहे. बाळोबा, निर्णय हा आधिच जाहीर आहे. ज्या दिवशीं कैरोंच्याबद्दल चौकशीमंडळ नेमायचं त्याच दिवशीं कैरों स्वच्छ आहेत असं सांगायचं. तुम्हीं आपले खुशाल ही भाजी घेऊन घरीं जा. मला उद्योगाला जाऊं द्या. अहो, भारत थियेटरमध्यें वन् मॅन् शो आहे...."

'म्हणजे बटाट्याची चाळ ?'

'तेंच तेंच.'

'मग पुलंनाच कां नेमत नाहीत ? ते सगळ्या भारताला हंसवतील.'

'निदान रडवणार नाहीत हें मोठं.'

त्याच विचारांत बाळोबा खोलीकडे गेले. मी माझ्या उद्योगाला.

पण बाळोबा पुलंच्या विचारांत अडकले. रात्री आले. त्यांनी विचारलं, 'अरे हे पुलं वगैरे पांचजण लडाखला गेले होते.'

'हो थोडी त्यांची हौस, थोडी सरकारची हौस. लडाखच्या अनुभवाबद्दल जाऊं द्या, पण त्या दर्‍यांतुन विमानानं जातांना पुलं मोठे मार्मिक बोलले म्हणतात.'

'काय...काय ?' बाळोबांनी अधीरुन विचारलं. ते पाळीव प्राणीच वाचतां वाचतां आले होते.

'त्या पांच जणांच्या पोटांत भीतीचा गोळा उठलेला असतांनाच पुलं म्हणाले 'याच क्षणीं जर आपलं विमान कोसळलं तर काय होईल....काय होईल..मराठी साहित्यांत केवढा तरी मोठा आनंदोत्सव साजरा होईल.'

बाळोबांनी उत्स्फूर्त हंसू टाळलं आणि उगीच दुःखी चेहरा करून विचारलं, 'ते पांच जण कोण ?'

'पु. ल. देशपांडे, ग. दि. माडगुळकर, पु. मा. भावे, वसंत सबनीस, व वसंत कानेटकर.'

'म्हणजे पंचायतनच होतं म्हणा. पण हे एकत्र बरे राहिले.'

'तें आपलं बाळोबा त्यानांच विचारा... नागपूरांतला अनुभव भीषण खरा.'

'कसला हो ?'

'एकत्रपणाचा. सात भावांतला सातवा संस्कृतचा शास्त्री. त्याला हवं होतं एकत्र कुटुंब. पण थोरली वहिनी एकत्रपणाविरुद्ध असल्यानं थोरला भाऊ एकत्रपणांत रहात नाही असा शास्त्र्यानं समज करून घेतला व केला खून त्या वहिनीचा.'

'मोठा पुरुषार्थ गाजवला शास्त्रानं. आतां झाला कां एकत्र संसार ? काळ्या पाण्यावर होईल नाहीतर फांसावर.'

'औद्योगीकरणामुळं आलेल्या विभक्त कुटुंबपद्धतीचा विचार या शास्त्र्याच्या मनांत यावा कसा ? बाळोबा, एकत्र काय किंवा विभक्त काय, दोन्हींचे फायदे तोटे आतां जगजाहीर आहेत. जॉईंट फॅमिली ही एकाच कुळांत को ऑपरेटिव्ह फॅमिली झाली तरच टिकणार. नाहीतर शकलं.'




अनुक्रमणिका

'अजबराव, मोठं तत्व सांगितलंत. आधीं घरीं सर्वांच्या कानी कपाळीं ओरडूं देहे.'

असं कांहीं बाळोबांना स्ट्राइक झालं म्हणजे बाळोबा लगेच पळतात.

गंगाधर गाडगीळांनासुद्धां असं कांहीं स्ट्राइक होत रहातं. मुंबई मराठी ग्रंथ-संग्रहालयानं एक परिसंवाद आयोजित केला. 'काव्य ही साहित्याची प्रथमावस्था कीं पूर्णावस्था.' काव्यापेक्षां गाडगीळांनी स्वत:ची त्यांत विचित्रावस्था करुन ठेवली आहे. गाडगीळांना काव्य लिहावेसें वाटत नाहीं. वाङ्मयीन दृष्टचा त्यांना तो उत्कृष्ट प्रकार वाटत नाहीं. कदाचित् त्यांना तें जमत नाही म्हणूनहि तसं वाटत असेल. खेदानें म्हणावे लागते की गाडगीळांच्या सारख्या साक्षेपी साहित्यिकाचं हें मत : 'ललित वाङ्मय प्रकारांत काव्याचा क्रमांक माझ्या दृष्टीनं शेवटचा आहे': पिकलेल्या फळापरी वाटत नाही. कुठलाहि वाङ्मय प्रकार हाताळला तरी साहित्यिक मूळांत कवि असावा लागतो. त्यानं चरणबद्ध किंवा 'मुक्तबद्ध' काव्यच लिहायला हवं असं नाही. खुद्द गाडगीळांचे साहित्यहि याला प्रमाण आहे. त्यांनीच हा विषय सुचवला तेव्हां त्यांना यापुढेहि अधिक विचार करायला कांहींच हरकत नाही. त्यांनाहि पटेल कीं काव्य ही साहित्याची प्रथमावस्थाहि नाही किंवा पूर्णावस्थाहि नाही; ती नित्यावस्था आहे. पण गाडगीळांनी समस्त कविवर्यांची झोंपमोड करून टाकली. खुद्द मौजेंतूनच त्यांच्या रहात्या ठिकाणावर मोर्चा अर्थात दाढी विनदाढीच्या, चमन विनचमनाच्या कविवर्यांचा, निघणार आहे असे ऐकिवांत येते. मोठा प्रेक्षणीय होईल हीच त्यांतली सत्यकथा. विदांना आघाडीवर ठेवलं कीं कुणाला घोषणा द्यायलाच नको. गाडगीळांच्या घरीं मोर्चाची अखेरची चहापार्टी होईल. मग गाडगीळ खुषीनं 'चहांतलं चांदणं' अशी झक्क काव्यपूर्ण कथा लिहितील. आणि एखादा अति उच्च भ्रूसमीक्षकसुद्धां शेरा मारील 'ही कथा नव्हेच तर तोकड्या कागदावरचें हे अफाट काव्य आहे.'

मित्रा, हे काव्य म्हणजे व्यसनांचा राजा आहे. नशाबंदी आहेच तरी..म्हणजे...म्हणूनच म्हणावेसे वाटते कीं नशापाणी न करतां स्वप्नरंजन करण्याची यांत खास योजना आहे. ईश्वराची यांतली कला माणूस लक्षांत घेत नाही आणि उगीच लपून छपून दारू नांवाचे कांहीं तरी पीत रहातो. हें व्यसन एवढं जबरदस्त आहे कीं तें टिकवण्यासाठीं अहमदाबादच्या कविनी चक्क रस्त्यांत ठाण मांडून समस्त रसिक वृंदाचे बूटपॉलिश करायला सुरुवात केली. पैसे कशाला तर काव्य छापण्यासाठीं मासिक चालवायला. या व्यसनांत स्वार्थच नाही तर परमार्थ आहे. लेकीबाळींच्या बाबतींत फार मोठी कामगिरी करता येते. केव्हां खाजगी केव्हां जाहीर मुलाखतींचा लाभ होतो.

'अहो, हल्ली कथेबद्दलहि असंच झालंय बघा.'

'तुम्हीं हल्लीं हळवें झालाय बाळोबा.'

'काय करणार. रेडिओवर एक परिसंवाद ऐकल्यापासून झालंय खरं तसं.'

'आपला ऽऽ दिवाळी अंकाबद्दल ?'

'हूं. त्या विजयाबाई म्हणाल्या कथेनं हळवेपणाच जोपासला पाहिजे. आतां आली काय आफत. आमच्यासारख्या कथा रसिकांना सुद्धां तो हळवेपणा हळूं हळूं जोपासायला हवा.'

'म्हणजे बाईचा हा फतवा आहे असा समज झालाय कीं काय तुमचा ? अहो व्यक्तिप्रमाणें व्यक्तिचे विचार. आपल्याला तोकडेपणाचं सामर्थ्य करण्याचं हें एक तंत्र आहे. बाईंच्या वाङ्मयांत हळवेपणाशिवाय कांहीं नाहीं. तेव्हां ठोकून देतो ऐसाजे.'

'अच्छाच्छा. अजबराव, काय क्लुप्ती आहे या साहित्यिकांची !'

'बाळोबा, माझा एक सल्ला ऐका.'

'काय ?'

'चांगलं वाचायला हवं असेल तर कुठलाहि दिवाळी अंक वाचू नका. हे पुरे महिने भरलेलं साहित्य नसतं.'

'म्हणजे रे ?'

'नेहमीचे अंक वाचा. चांगलं वाचायला मिळेल.'

'बाकी खरं आहे हं. अनुभव येतो खरा. अरे आमच्या घरांतल्या महिला मंडळानं जाडे जाडे दहा दिवाळी अंक विकत घेतले. असे पैसे फुकट जातात आणि आर्थिक ओढाग्रस्तीचा लंबक डुचमळतो. अरे पण ती स्वस्त आणि रास्त पुस्तकं निघालींत ती तरी ?'

'उपक्रम फार चांगला आहे.. व्यवहाराला व्येवादाचं अस्तरहि आहे. पण त्यातलं मुद्रां किमतीचं गणित क्रियाशील वाचकाला कोड्यांत टाकणारंच आहे...प्रकाशनाच्या धंद्याला तें अधिक चव्हाट्यावर आणतंय हेंच खरं.'

'तें कांहीं कां असेना. खोल पाण्यांत गेलं कीं गाळांतहि रुतण्याची शक्यता. पण या मिरवणुकींत सामील व्हायला हरकत नाहीं. कसं ?'

'बाळोबा, अगदीं हिरवा दिवा.'

'अरे तुझ्या खोलीवर मी इतक्यांदा येतो पण एकदां तरी चहा पाजलायस काय?'

'अनेकदा दिलाय. पण देणाऱ्याला श्रेय देण्याची तुमची रीत नाही. आत्तां घ्या.'

मी आंतल्या खोलींत गेलो. स्वत:ला चहा केलाच होता. एका कपांतुन बाळोबांच्यासाठीं आणला.

चहा बघून ते टोळासारखें उडालेच.

'काय हो बाळोबा'

'अरे हें काय सायकलीच्या टयूबमधलं कीं काय ?'

'टयूबमधलं ? चांगलं उसाच्या सोटयातलं आहे. अहो साखर नाही म्हणून उसाचा रस आणला आणि केला चहा.'

क्षणार्धांत बाळोबांनी घरच्या महिला मंडळाचा उद्धार केला.

●●●




## महाराष्ट्राच्या नव्या मंत्रिमंडळाचे स्वागत

**गेल्या** महिन्याच्या ५ तारखेस महाराष्ट्राचे नवें मंत्रिमंडळ कार्यवाहींत आले. तत्पूर्वी माजी मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण ह्यांच्या मार्गदर्शनाखालीं पक्षसभासदांची बैठक होऊन त्यांत श्री. वसंतराव नाईक ह्यांना पक्षनेते व श्री. बाळासाहेब देसाई ह्यांना उपनेते नियुक्त करण्यांत आले होते. ह्या नियुक्तीपूर्वी वृत्तपत्रांत वावड्या उठवून इतर कांहीं जणांची नांवें मुख्य मंत्रीपदासाठीं सुचविण्यांत आली होती. त्यामुळें प्रस्तुत पक्षाच्या सभेंत कांहींतरी गोंधळ अगर वेबनाव होण्याची अपेक्षा होती. पण पक्षाची सभा खेळीमेळीने व एकजुटीच्या वातावरणांत पार पडली व निवडहि एकमताने झाली. सभेसाठीं निरीक्षक म्हणून उपस्थित असलेल्या श्रीमती इंदिरा गांधीनाहि ह्या अपूर्व वातावरणाने आश्चर्यच वाटले असेल. मंत्रिमंडळाची पुनर्रचना करतांना कांहीं क्रांतिकारक बदल होणे अपेक्षितच होतें. कामराज योजनेच्या फतव्यामुळें मंत्रिमंडळांची संख्या घटवणे जसें प्राप्त होते तसेच ह्या घटलेल्या संख्येमुळें आवश्यक खातेबदलहि करणें युक्त होते. विशेष प्रमुख बदल झाला म्हणजे श्री. बाळासाहेब देसाई ह्यांच्यासारख्या तडफेच्या कणखर मंत्र्याकडे गृहखाते येऊन श्री. वर्ध्याकडे असलेलें अर्थखातें बॅ. वानखेडे ह्यांजकडे आले. स्वतः मुख्यमंत्र्यांनीं आपल्याकडे महसूल, नियोजन, सामान्य प्रशासन व जंगल ही खातीं घेऊन जबाबदारीचा सिंहाचा वाटा उचलला हे युक्तच झालें.

नव्या मंत्रिमंडळानें राज्यकारभाराच्या सुरवातीसच कांहीं नेत्रदीपक निर्णय घेऊन आपल्या कारकीर्दीस यशस्वी वळण लावलें. स्थानबद्धांच्या सुटकेचा त्यांचा निर्णय स्वागतार्ह ठरला. विशेषतः गेले आठ महिने कारावासांत असलेले कामगार नेते व नगरपिते श्री. जॉर्ज फर्नांडीस ह्यांच्या सुटकेमुळें कामगार जनतेला त्यांनीं आपलेसें केलें. ह्याशिवाय दारुबंदीच्या धोरणाच्या फेरविचाराची त्यांनी दिलेली ग्वाही त्यांच्या आर्थिक व सामाजिक प्रगतीशील धोरणाची



**महाराष्ट्राचे नवें मुख्यमंत्री**
**श्री. वसंतराव नाईक**

साक्ष देते. ग्रामीण टापूच्या विकासासाठीं अधिक सवलती देण्याची मुख्यमंत्री नाईक ह्यांची घोषणाहि अशीच उपकारक आहे. ग्रामीण व नागरी विभागांत समतोल राखण्याची त्यांची मनीषा ग्रामीण जनतेला दिलासा देईल. इतर क्षेत्रांतहि व्यवहार्य व लोकोपयोगी धोरण स्वीकारून राज्ययंत्रणेला गति देण्याची कै. कन्नमवारांची आकांक्षाहि ते सिद्धीस नेतील असा विश्वास वाटतो. सीमा विभागांतून विधानसभेवर आलेल्या नागरिकांच्या मोर्चाला सामोरे जाऊन व त्यांचे प्रश्न अविलंबेकरून सोडवण्याचें आश्वासन देऊन श्री. नाईक ह्यांनीं जो पायंडा पाडला त्यामुळें ह्या दुरावलेल्या जनतेच्या श्रमांचे चीज झाले असें म्हणायास हरकत नाहीं. पानशेत अहवालाच्या विधानसभेंत झालेल्या चर्चेला उत्तर देतांनाहि त्यांनी जी सर्वग्राही भूमिका पत्करली तसेंच विरोधी पक्षाला तुच्छ न लेखतां अगर त्यांचा अनादर न करतां 'झालें गेलें विसरून आपण सहकार्यानें पुढील कामाकडे वळूं या' असे केलेलें आवाहन त्यांच्या आगामी कारकिर्दीला उपकारकच ठरेल यांत संदेह नाहीं.

महाराष्ट्राच्या ह्या नवीन मंत्रिमंडळाचे आम्हीं हार्दिक स्वागत करतो व त्यांच्या हातून असेंच उपयुक्त कार्य घडून श्री. यशवंतराव चव्हाणांची लोकाभिमुख राहाण्याची प्रथा श्री. नाईक व त्यांच्या सहकाऱ्यांच्या हातून कार्यान्वित होवो असे आम्ही चिंतितो.

• •

## गोव्यांत लोकशाही

**गेल्या** महिन्यांत गोव्यांत निवडणुकीनें झालेली लोकशाहीची सुरवांत सर्व दृष्टीनें संस्मरणीय अशीच ठरेल. गोव्याच्या ह्या निवडणुकीकडे सर्वांचेंच डोळे लागलेलें होते. कांग्रेस पक्षांतल्या कांहीं संधिसाधु नेत्यांना गोव्याचे सुपीक कुरण आयतेंच चरायला मिळालें व त्याचा फायदा पक्षाच्या प्रचाराच्या निमित्तानें स्वतांचे महत्व वाढवावयाला आणि स्वार्थ साधायला त्यांनीं चांगलाच करून निवडणूकीच्या अपयशाला यथाशक्ति हातभार लावला. आगामी निवडणुकांचा फायदा कांहीं बुजुर्ग व कांहीं वाजारबुणग्या पत्रकारांनीं उठवून उत्साही धनवंताच्या जीवावर वृत्तपत्रें संपादण्याचें आपलें स्वप्न साकार केलें, आणि गोव्यांतहि क्वचित् वाचल्या जाणाऱ्या आपल्या वृत्तपत्रांचा आपल्या पराभूत अकलेचें दिवाळें प्रगट



अनुक्रमणिका






केलें. गोव्यांतल्या जातीयवादी जनतेला त्यांच्या हिताचे (?) चार शब्द सांगून आपल्या पदराखालीं त्यांच्या विशिष्ट संस्कृतीचे रक्षण करण्याचा अशिष्ट उपक्रम गोवा स्वातंत्र्यानंतर 'हाय कमांड'नें सुरू केला होता. त्याला ह्या निवडणुकीच्या रंगणांत स्वार्थ साघु घनवंतांनीं प्रगटपणें कोल्हेकुई करून साथ दिली व अशा रितीनें अनुकूल कौल मिळण्यासाठीं यथायोग्य वातावरण निर्माण करून गोव्याच्या ह्या पहिल्या निवडणुकीची तयारी परिपूर्ण करण्यांत आली.

गोव्यांतल्या जनतेनें पिढ्यानपिढ्या पोर्तुगीजांचे अत्याचार सहन केले होते. मेलेल्या मनाने आपापले दैनंदिन जीवन रखडत कंठणाऱ्या प्रजेला दडपशाहीचे जूं झुगारून दिल्यानंतर प्राप्त झालेल्या स्वातंत्र्यामुळें अनावर आनंद झाला होता. स्वातंत्र्यप्राप्तीच्या महोत्सव प्रसंगीं ह्या उत्साहाला गोव्यांत कसें उधाण आले होते ह्याची साक्ष उपस्थितांना स्मरत असेलच. त्यावेळींहि महाराष्ट्र प्रेम व्यक्त करणाऱ्या जनतेला आपल्या स्वतंत्रतेच्या व वैशिष्ट्याचे जाणीवेचे अमली वाळकडू पाजून स्थानिक पुढाऱ्यांच्या व बाहेरील उपऱ्या सल्लागारांच्या अधिकारी मुखांतून त्यांची दुर्बलता ठरविण्याचा यत्न केला गेला होता. कालांतरानें सत्य परिस्थितीची जाणीव झाल्यावर जनमताच्या इच्छेप्रमाणें विलीनीकरण अथवा इष्ट राज्यपद्धतीचें मधाचें बोट मध्यवर्ती सरकारच्या सर्वाधिकाऱ्यांनीं लावून शांत केलें होतें. निवडणुकीचा हा समय जनमताचा अनुनय करण्यांत पक्षोपक्षाने उपयोजिला. बिचाऱ्या दरिद्री महाराष्ट्रवाद्यांना वृत्तपत्राच्या व प्रगट प्रचाराच्या साधनांच्या अभावीं जनतेच्या सद्सद्विकेबुद्धीवर व विश्वासावर भर देऊनच आपलें कार्य करावें लागलें. प्रजासमाजवाद्यांच्या सहकार्यामुळें ह्या अनुभवी प्रचाराला तुफानी वक्तव्याची जोड मिळून जनतेला खऱ्या हिताचे चार शब्द सांगणारी अधिकारी राजकारणी नेते ऐन मोक्याच्या वेळीं सहाय्यास आले. गोव्यांतल्या साध्याभोळ्या जनतेने ह्या लोकशाहीच्या अपूर्व प्रयोगांत खुल्या दिलानें मतप्रदर्शन करून दडपलेल्या जीवनामुळें कोंडलेल्या खऱ्या आंतल्या आवाजाची साक्ष निवडणूकींत जाऊन नोंदली. आणि त्याचा अपेक्षित परिणाम निवडणूकीचे पारडे सत्याच्या बाजूनें जड होण्यांत होऊन दरिद्री महाराष्ट्रवाद्यांचा अपूर्व विजयांत ह्या वाग्यज्ञाची सांगता झाली. ह्या अपूर्व यशानें नाक कापले गेलेल्या शूर्पणखेचे विपारी फूत्कार मात्र अजून संपलेलें दिसत नाहींत. गोव्यांत काँग्रेसचा अपमृत्यु होऊनहि कांहीं संधिसाघु लोक तिच्या नाकाशीं सूत धरून ती जिवंत असल्याचा गवगवा करीत आहेत. सालाझार राजवटीच्या अचानक मृत्यूमुळें स्वतंत्रतेचा वारसा प्राप्त झालेल्या जनतेला खोट्या मृत्युपत्राची लालूच दाखवून मृत काँग्रेसच्या सर्वाधिकारी संरक्षणाचा वारसा हक्क जारी करण्याचेहि प्रयत्न सुरूं झाले आहेत. गोमंतकीय जनता आतां जागृत झालेली आहे. ज्या हौसेनें तिने हे लोकशाहीचे लेणें अंगावर बाळगण्याचे मान्य केलें तिला जर ही लोकशाही चौदा टक्के मुलाम्याची आढळली तर हें मळमळित सौभाग्य फेकून देऊन उफाळलेल्या वृत्तीनें रास्त हक्कांसाठीं बंडाचा झेंडा उभारण्यास ती मागेपुढे पाहाणार नाहीं. हे स्वार्थी पुढाऱ्यांनीं वेळींच उमजून घ्यावें.

• •

## श्री. दयानंद बांदोडकर

**गोव्यांमध्यें** झालेल्या निवडणुकांमध्यें महाराष्ट्रवादी गोमंतक पक्षास निर्विवाद बहुमत प्राप्त झाल्याचे ऐकून कुणाहि महाराष्ट्रप्रेमी व्यक्तीस आनंद झाल्याशिवाय राहाणार नाहीं. ह्या विजयाचें सर्व श्रेय महाराष्ट्रवादी गोमंतक पक्षाचे अध्यक्ष श्री. दयानंद बांदोडकर ह्यांचेच आहे हे कुणीहि मान्य करील. कॉंग्रेससारख्या अखिल भारतीय प्रबल व सत्तारूढ पक्षाला विरोध करणें ही साधीसुधी गोष्ट नव्हती. पैशाचा, पुढाऱ्यांचा व प्रचाराचा भरघोस पाठिंबा असलेल्या ह्या पक्षाने निवडणुकीस आपले सर्व सामर्थ्य पणाला लावण्याचे ठरवले होतें. महाराष्ट्रवादी कॉंग्रेस उमेदवारांना प्रलोभनें दाखवून व शिस्तीचा बडगा दाखवून महाराष्ट्रवादाचा कणा मोडण्याचा कुटील डावहि साधण्यास कॉंग्रेसच्या चाणाक्यांनीं साधण्याचा प्रयत्न केला. स्वार्थी उद्योगपतींना फूस देऊन त्यांनाहि आपल्या बाजूस ओढण्याचा प्रयत्न केला गेला. पण ह्या प्रतिकूल परिस्थितीतहि गोव्याच्या महाराष्ट्रवादी जनतेनें योग्य तो कौल देऊन कांग्रेसच्या अप्रिय अस्तित्वालाच नापसंती दर्शविण्याचे जे बहुमोल कार्य केले त्याला भारताच्या इतिहासांत तोड नाहीं. पं. नेहरूंच्या महाराष्ट्रद्वेषी धोरणांत सूर मिळवणाऱ्या अमहाराष्ट्रवादी स्वार्थी कांग्रेसपुढाऱ्यांचे डोळे ह्या निवडणुकीच्या परिणामाने उघडतील आणि पूर्वी आश्वासन दिल्याप्रमाणें गोव्याच्या प्रातिनिधिक सभेला विलीनीकरणाचे स्वातंत्र्य आतांतरी मिळेल अशी अजूनहि अपेक्षा वाटते. "ह्या सभेच्या पहिल्याच बैठकींत 'गोवा महाराष्ट्रांत विलीन करा' अशा आशयाचा ठराव केला जाईल यांत शंकाच नाहीं" असें नुकत्याच दिलेल्या मुलाखतींत श्री. बांदोडकरांनीं अधिकारवाणीनें जाहीर केलें आहे. पं. नेहरूंनीं ह्या निवडणुकीच्या यशाला हरताळ फासण्यासाठीं आगऱ्याला अपशकुनी व्यक्त केलें. पण बांदोडकरांनीं त्यांचे मन वळवण्याचे यत्न करण्यासाठीं प्रयत्न चालविलें आहेत. श्री. बांदोडकर हे स्वतः उद्योगपति व एकापरीनें कॉंग्रेसजन असूनहि त्यांनीं स्वीकारलेली व पुरस्कारलेली भूमिका त्यांच्या निस्वार्थी नेकीची व स्वतंत्र प्रवृत्तीची साक्ष देते. श्री. बांदोडकर हे वृत्तीनें धार्मिक आहेत. गोव्यांतल्या अनेक धर्मस्थानांना व धार्मिक उत्सवांना त्यांनीं सढळ हातानें मदत केली आहे. गोव्याच्या कानाकोपरा शिकारीच्या छंदापायीं त्यांनीं पालथा घातला होता. रानांतले दगड निवडून त्यांचे पृथक्करण करण्याचा त्यांचा नाद अजब असला तरि त्यांतूनच त्यांच्या खाणव्यवसायाची सुरवांत झाली हे ध्यानांत घेण्यासारखें आहे. दगडांच्या ओळखी बरोबर जनतेचीहि ओळख करून घेतली.



अनुक्रमणिका





व तीहि सहिष्णु नम्रवृत्तीनें. गोव्याच्या ह्या निवडणूकींतल्या त्यांच्या पक्षाच्या अपूर्व विजयांत श्री. दयानंद बांदोडकर हे शिरोभागीं चमकले असते तर दुधांत साखर पडली असती. आजहि त्यांच्या पक्षाची सर्व सूत्रें त्यांच्याच हाती सुपूर्द करून त्यांच्या खंबीर व निर्भय नेतृत्वाखाली राज्याची नौका योग्य त्या दिशेनें चालविण्याचा विश्वास व्यक्त केला आहे. श्री. दयानंद बांदोडकरासारखे खंबीर निस्वार्थी व द्रष्टे नागरिक गोव्यांत निर्माण झाले तर गोव्याचे भवितव्य खासच उज्वल राहील. श्री. बांदोडकर ह्यांचे आम्हीं मनःपूर्वक अभिनंदन करतो, आणि गोवें महाराष्ट्रांत विलीन करण्याचे त्यांचे त्यांच्या पक्षाचे आणि त्यांच्या पाठीमागे निकरानें खड्या असलेल्या महाराष्ट्रप्रेमी जनतेचे स्वप्न लवकरच साकार होवो असें चिंतितो.

● ●

## 'सोनियांचा दिवस आजि'

**'गोवा** हिंदु असोसिएशन' या संस्थेच्या कलाविभागानें आपल्या आयुष्यांतील सोनियांचा दिवस गेल्याच महिन्यांत पाहिला. या विभागातर्फे निर्मित प्रा. वसंत कानेटकर यांच्या "रायगडाला जेव्हां जाग येते" या नाटकाचा शंभरावा अत्यंत यशस्वी प्रयोग त्या दिवशीं झाला. असोसिएशन ही एक सामाजिक संस्था. अर्थांतच लहान लहान सामाजिक सुधारणेच्या चळवळीचीं वलयें अधुनमधून तिथें उमटत असत. मुंबईंतील इतर कांहीं प्रांतिक संस्थांप्रमाणेंच याहि संस्थेंतील कांहीं सज्जन सेवक संस्थेचें कार्य जागृत ठेवत असत. आपल्यापुरती ही संस्था मर्यादित होती; परंतु तिनें कलाविभाग सुरू केला. आणि तिथें चैतन्य उठलें. जिकडे तिकडे संस्थेचें नांव होऊं लागलें. कलाविभागानें सादर केलेलीं नाटकें राज्यसरकारच्या नाट्यस्पर्धांत यशस्वी होऊन पहिल्या पारितोषिकाचीं मानकरी ठरलीं.

### रामकृष्ण केशव नायक

असें कांहीं यश मिळालें कीं नवी ईर्षा उत्पन्न होते; नवी भर टाकण्याकरितां नवनवें संकल्प केले जातात; पण असे संकल्प यशस्वी होतातच असें नाहीं. कांहीं कांहीं वेळां जबरदस्त धक्काहि बसतो. कलाविभागाला असें धक्के मध्यंतरीं सारखें मिळत गेले. आणि अपयश पदरी आल्यावर 'लढने को तुम, और खाने को हम' ! अशा वृत्तीच्या माणसांनीं मतलबीपणानें दिलेला दोष हा अधिक खेदकारक असतो; पण कलाविभागाचें सुदैव असें कीं, जन्मतःच त्याला दोन तीन कार्यकर्ते असे लाभले कीं त्यांनीं अपार निष्ठेनें आणि त्यागानें हा विभाग जिवंत ठेवला. ईर्षा सातत्यानें जागृत ठेवली. अकारण मानहानी सहन करून प्रसंगीं पदरमोड करून ज्यांच्या अविश्रांत प्रयत्नांमुळें संस्थेला हा सोन्याचा दिवस पाहाण्याचें भाग्य लाभलें, व ज्यांच्या कार्याची प्रशंसा मुक्त कंठानें या विभागाचे अन्य सहकारीहि करतात त्यांचें नांव श्री. रामकृष्ण केशव नायक.

### निःपक्षपाती गौरवोद्गार

सार्वजनिक कार्याची शक्ति पूर्वपुण्याईनें लाभते. निदान वारसा तरी मिळावा लागतोच. रामकृष्णांना तो वारसा वडिलांकडून मिळालेला आहे. मडगांव गोवा येथील 'वनिता विद्यालय' प्रागतिक संघ, सारस्वत ब्राह्मण समाज इत्यादि मान्यवर संस्थांचे श्री. केशव अनंत नायक हे संस्थापक व आजीव सेवक. अनेक सभा–संमेलनांची धुरा त्यांनीं वाहिलेली आहे. अनेक सार्वजनिक कार्यें यशस्वी करून दाखविलेलीं आहेत. रामकृष्णांनीं तें प्रत्यक्ष पाहिलेलें आहे. अशा कार्याला लागणारें चिकाटीचें बाळकडू त्यांना मिळालेलें आहे. कलाविभागाची मध्यंतरीचीं पडती बाजू सांवरायला या तरुणानें जे अविश्रांत श्रम केले ते त्या संस्थेच्या सर्व सभासदांना, आधारस्तंभांना ज्ञात आहेत. म्हणूनच शंभराव्या यशस्वी प्रयोगाच्या वेळीं असोसिएशन आणि कलाविभागासंबंधींची माहिती सांगतांना —प्रा. व्यं. ना. नाईक यांच्यासारख्या निःपक्षपाती कार्यकर्त्यांनाहि रामकृष्ण नायकांचा खास उल्लेख करून गौरवोद्गार काढल्याशिवाय राहवलें नाहीं. स्वहिताकडे दुर्लक्ष करून केलेल्या समाजसेवेचा योग्य गौरव झाला.

### पुढचें पाऊल

"या संस्थेनें कलाविभाग सुरू केला तेव्हांच तिनें खरें कार्य सुरूं केलें" असें त्या दिवशींचे मुख्य पाहुणे भारताचे संरक्षणमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण देखील म्हणाले. धन्य वाटलें. एका संस्थेचा फार मोठा गौरव झाला. पर्यायानें कलाभूमि असा लौकिक असलेल्या गोमांतकाचाहि. गोवा हिंदु असोसिएशनच्या कलाविभागाचें या पुढलें पाऊल नव्या नेटाचेंच असेल. रामकृष्ण नायकांप्रमाणेंच त्यांचे आणखी दोन तळमळीचे सहकारी श्री. सातोस्कर व गुडे पुढील संकल्पित कार्यांत पूर्वीच्याच जोमानें झटतील आणि पुन्हां एकदां हाच दिवस पाहतील यांत संदेह वाटत नाहीं. उंटावरून शेळ्या हांकण्याची वृत्ति असलेल्यांनीं मात्र स्वतःचें अस्तित्व जाहीर करण्यासाठीं नसती लुडबूड करूं नये अशी नम्र विनंति या प्रसंगी करावीशी वाटते!

● ●

## मार्मिकची एकाकी झुंज

**हिंदुस्थानला** स्वातंत्र्य मिळाल्यानंतर देश सुधारण्याच्या, समाज सुधारण्याच्या अशा अनेक चळवळी राज्यकर्त्यांनीं भराभर हातांत घेतल्या. सामाजिक स्थिति सुधारण्यासाठीं आवश्यक अशीं अनेक बंधनें विचारपूर्वक लादण्यांत आली. इंग्रजी अमदानींत मद्यपान व जुगार या दोन गोष्टींना मुक्त स्वातंत्र्य होतें. नाना तऱ्हेची दारू आणि नाना तऱ्हेच्या 'लॉटऱ्या'—कुणाचा कुणाला मेळ नव्हता. पाश्चात्यांच्या धर्तीवर शब्दकोडींहि चालत; पण तीं इंग्रजींतच असल्यानें ठराविक वर्गाखेरीज सामान्य माणसाचा त्याच्याशीं संपर्क नव्हता.

### सोडवा सत्वर कोडें हें सुंदर

दारूवर बंदी आली नि त्यामागोमाग लॉटऱ्यांसारखा जुगारहि बंद झाला.

सामान्य माणसाला झुलविण्याकरितां आतां कोणती नवी क्लुप्ति काढावी या विषयांत त्या त्या प्रांतांतलें अध्वर्यु गर्क झाले; पण थोडयाच अवधींत त्यांना मार्गहि सांपडले. द्राक्षाची दारू वंद झाली म्हणून जसें रुद्राक्षाच्या देशांतील लोकांचें अडलें नाहीं, तद्वतच लॉटऱ्या वंद झाल्या म्हणून गरीब माणसाला नशीबाची परीक्षा पाहायला लावणाऱ्या वुद्धिमंतांचेंहि अडलें नाहीं. 'शव्दकोडें' हा राजमार्ग त्यांना सांपडला. आणि या सुरळीत राजमार्गावरून त्यांच्या काळयाशार गाडया धांवूं लागल्या. कालांतरानें या 'वरुनी धुवट सोवळया' पण लॉटरीपेक्षांहि भयंकर अशा जुगाराची शासनकर्त्यांना दाद लागली. चौकशी होऊन त्यावरहि वंधन घातलें गेलें; पण तोंपर्यंत अनेकांनीं त्या वाहत्या गंगेंत आपले हात धुवून घेतले होते. स्वतःचीं 'विभव मंदिरें' उभारलीं होतीं. वक्षिसाची रक्कम स्वतःच खाल्ल्यावद्दल कोडें चालविणाऱ्या अनेकांवर खटलेहि भरले गेले होते; पण तीं नाटकें फार वेळ चाललीं नाहींत. कालाच्या उदरांत गडप झालीं.

## रंजनम् श्रमभंजनम्

कोडयांवर वंदी घातली खरी, असंख्य सामान्य लोकांना त्यांत डोकें चालवायला लावणाऱ्यांचीं सुपिक डोकीं त्यामुळें थोडींशीं सुन्न झालीं; पण तीं थोडींशींच. 'कोडें' या शव्दांत जुगाराचा अर्थ ध्वनींत होत होता– 'स्पर्धा' या शव्दांत तो नव्हता. तेव्हां वहुजन समाजाच्या कल्याणार्थ कोणत्या रीतीनें वद्धपरिकर व्हावें या विषयांत तीं डोकीं चालूं लागलीं. आणि काय आश्चर्य–चुटकीसरशीं नवा मार्ग सांपडला. सुखवस्तु लोकांचें रंजन, कष्ट करणाऱ्यांचें श्रमभंजन आणि नशीवाची वाट पहात राहाणाऱ्यांना तावडतोव 'विभव मंदिर' उभारून देण्याकरितां अतयेव मराठी साहित्याची सर्वांगीण उन्नति व्हावी या इच्छेनें साहित्यांतील 'शव्द स्पर्धाचा' जन्म झाला. मुकुंदराजांपासून सगळया संत व पंत कवींच्या महाकाव्यांतील पंक्ति व अर्वाचिन साहित्यांतील सुंदर सुंदर वाक्यें काढून त्यांतील एखादा शव्द गाळून तो भरण्याकरितां केवळ चौकटी दिल्या गेल्या. चौकटींत एकाच अर्थाचे फक्त दोन दोन शव्द दिले गेले. दिलेल्या काव्यपंक्तींतील किंवा वाक्यांतील तो शव्द कीं हा शव्द एवढेंच सांगायचें. जो नसेल तो खोडायचा. वक्षिसाच्या रकमेला कांहीं शेकडयांनी सुरवांत झाली. तेव्हां प्रवेश फी फक्त चवली पावली पर्यंत होती. आतां वक्षिसाची रक्कम लाखाच्या आसपास असल्यानें प्रवेश फी रुपया दोन रुपयांपर्यंत वाढलेली आहे.

## विस्मयजनक रहस्याचा साक्षात्कार

महाराष्ट्रांतील थोर थोर विद्वान, थोर साहित्यिक, धर्मरक्षक, संस्कृतिरक्षक, कायदे–पंडित, राज्यकर्ते प्रभृतींचा या स्पर्धांना पाठिंवा असल्याचें नित्य जाहीर झालेलें आहे. निरनिराळया वेळीं त्यांनीं या शव्दस्पर्धा कचेरींना दिलेल्या भेटी गांठींचीं, सहभोजनाचीं छायाचित्रें आणि सुखसंवाद मराठी वृत्तपत्रांचे रकानेच्या रकाने भरून प्रसिद्ध होऊन त्यावर शिक्कामोर्तवहि झालेलें आहे. तेव्हां अशा जनकल्याणाची एकमेव कांस धरून झटणाऱ्या शव्द–स्पर्धांमागें कांहींतरी काळेंवेरें रहस्य असेल–तो एक जुगार असेल–अशी नुसती शंका कुणाला येणें हें शक्य तरी होतें का? जनसेवेचें कंकण हातीं वांधून त्यानुसार चोख वर्तन ठेवणाऱ्या एकाहि मराठी वृत्तपत्राला नियतकालिकाला यांत कांहीं छुपा मतलव असेल असें अजूनहि वाटलेलें नाहीं; पण मार्मिककारांना वाटलें. या शव्दस्पर्धांमागील विस्मयजनक रहस्यमय गुंतागुंतीचा त्यांना साक्षात्कार झाला; व त्यांनी महान धैर्यानें या काळया रहस्यावर प्रकाश टाकण्याचें ठरवून गेल्या कांहीं अंकांत त्याचा स्फोट केलेला आहे.

मार्मिकारांनीं छापलेल्या त्या महा भयंकर रहस्यकथांवर नुसती नजर टाकली तरी अंगावर कांटा उभा राहातो. हर हर! खरोखर आपण एखाद्या अंधेर नगरींत तर रहात नाहींना, अशी शंका मनांत येऊन भविष्यकाळावद्दल भीति वाटूं लागते. मार्मिककारांचें केवळ अभिनंदन करणें आणि त्यांनी दिलेल्या या एकाकी झुंजीवद्दल त्यांचें यश चिंतिणें या व्यतिरिक्त आम्हीं तरी आणखी काय करूं शकणार?

# श्री. दामोदर सामंत

**महाराष्ट्र** राज्याचे उप प्रसिद्धी संचालक श्री. दामोदरपंत सामंत ह्यांची नियुक्ति सिलोन सरकारच्या नियंत्रणामुळें प्रसिद्धी-संघटनेची व्यवस्था पाहण्यासाटीं गेलेल्या प्रसिद्धी संचालक श्री. विनोद राव ह्यांच्या जागीं करण्यांत आल्याचे ऐकून आम्हांस आनंद वाटत आहे. कांहीं स्वार्थी राजकरणी लोकांच्या कारवाईमुळें श्री. सामंत ह्यांना अतिशय मनस्ताप सहन करावा लागला. पण ह्या अपमानास्पद वातावरणांतहि आपले सौजन्य न सोडतां त्यांनीं शांतपणें सर्व सहन केलें. कालांतराने सत्य परिस्थितीची जाणीव होतांच त्यांच्यावद्दलचे किल्मिष दूर झाले. एवढेच नव्हे तर त्यांच्या खऱ्या कर्तुत्वाची ओळख पटल्यावर श्री. विनोद राव ह्यांच्या अनुपस्थितींत त्यांना खातेप्रमुखाच्या स्थानीं वढती देण्यांत आली होती. श्री. सामंत हे स्वभावानें (व वेषानेहि) अत्यंत साधे व निगर्वी सद्गृहस्थ आहेत ह्याची प्रचिति त्यांच्या ओझरत्या होणाऱ्या परिचयांतहि कुणाला सहज येऊ शकते. वृत्तपत्रकारांच्या अडचणीची खरी जाणीव त्यांना आहे. कुण्याहि छोटयामोठया पत्रकाराला अडीअडचणींत तत्परतेनें सहाय्य करून कित्येकदां सरकारी तांवडया फितीची उकल हळुवारपणें करून व कधींकधीं तर ती तोडूनहि त्यांनीं नियतकालिकांना दिलासा दिला आहे. कोणीहि त्यांना खुल्या दिलानें अडचण सांगावी, तक्रार करावी किंवा सहकार्य मागावे ते हंसतमुखाने त्यांनीं दिलेले नाही असा प्रसंग अपवादात्मक सुद्धां आढळणार नाहीं. उपकार करूनहि त्यांनीं त्याची अशी जाणीव कधीं करून दिलेली नाहीं. तसेच अपकार साहूनहि त्याचा राग कधी मनांत बाळगलेला नाहीं. प्रसिद्धी खात्यांत अनेक वर्षें कार्यक्षमतेने काम करूनहि प्रसिद्धीविन्मुख राहणारा त्यांच्यासारखा सज्जन अधिकारी विरळाच. आणि म्हणूनच त्यांच्या मूक तपश्चर्येनें प्राप्त झालेल्या ह्या गौरवपदावर ते अधिकारवाणीनें विराजत असलेलें पाहून त्यांचे अभिनंदन करण्यास विशेष आनंद वाटत आहे. श्री. सामंत आपल्या कारकिर्दीत यशस्वी होतील ह्यावद्दल सर्वांनाच विश्वास वाटेल ह्यांत संदेह नाहीं.

**–सारस्वत**








## दीपावली बुद्धिबळ क्र. ३ :

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | | २ | | ३ | ■ | ४ | ■ | ५ |
| | ■ | | ■ | ६ | | | | |
| ७ | ८ | | ■ | | ■ | | ■ | |
| ■ | | ■ | ९ | | १० | ■ | ११ | |
| ■ | १२ | | | ■ | १३ | | | ■ |
| १४ | | ■ | १५ | १६ | | ■ | | ■ |
| | ■ | १७ | ■ | | ■ | १८ | | १९ |
| २० | | | | | ■ | | ■ | |
| | ■ | | ■ | २१ | | | | |

"दीपावली बुद्धिबळाचे" नियम व अटी मला मान्य आहेत.

स्पर्धकाचें नांव ______________________

______________________

पूर्ण पत्ता : ______________________

______________________

**दीपावली बुद्धिबळ क्र. ३**

येथें कापा

**आडवे शब्द—**

१ शेवटी उगवणारा दांत
६ स्वतःची नुसती प्रौढी सांगणारा
७ पुष्कळ
९ मागें पारा लावलेली कांच
११ स्त्री
१२ श्रीकृष्ण
१३ नामाचा क्रियापदाशीं असणारा संबंध
१४ खिडकी
१५ संग्राम
१८ मऊ
२० श्री विष्णु
२१ चंद्र

**उभे शब्द—**

१ फुलांचा अर्क
२ सोने, चांदी इ. ची कांव
३ डौलदार
४ लग्नाची बायको
५ घोडेस्वार
८ किल्ल्यावरील शिपाई
९ श्रम–कष्ट
१० आकारयुक्त
११ पुंगी
१४ झुरळ
१६ भ्रमर
१७ बक्षीस
१८ कमळांचा समूह
१९ दहावी रास

**उत्तरें पाठवावयाची शेवटची तारीख १५ जानेवारी १९६४ अधिकृत उत्तर–पुढील अंकांत**

**स्पर्धकांकरितां नियम व अटी———**

१. ही स्पर्धा निःशुल्क आहे.
२. ह्या स्पर्धेत कोणालाहि भाग घेता येईल.
३. स्पर्धेकरितां पाठविण्यांत येणारीं उत्तरें ह्याच पानावर छापलेल्या **चौकोनी कुपनांत** भरलेलीं असावीत. कूपनावर नांव व पत्ता लिहिणें आवश्यक आहे. **अन्यथा तीं विचारांत घेतलीं जाणार नाहींत.**
४. उत्तरें **'दीपावली बुद्धिबळ,'** संपादक, **'दीपावली,'** दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई–४ या पत्त्यावर पाठवावीत.
५. ह्या स्पर्धेकरितां आलेल्या अचूक उत्तरां-तून ती **लॉट पद्धतीनें काढून** ज्यांचें उत्तर आमच्या उत्तराशीं बिनचूक असेल, अशा **पहिल्या पांच भाग्य-वान विजेत्यांना** दीपावलीचें **वार्षिक वर्गणीदार** करण्यांत येईल व त्यांना वर्षभर दीपावली भेट म्हणून पाठ-विण्यांत येईल.
६. एकावेळीं एकाच स्पर्धकास फक्त एकच चौकोन पाठविता येईल.
७. स्पर्धेबावत संपादकांचा निर्णय अखेरचा मानला जाईल. त्याबावत कसलाहि **पत्रव्यवहार केला जाणार नाहीं.**
८. उत्तरें पाठवावयाची अंतिम तारीख १५ जानेवारी १९६४ ही आहे. नंतर येणाऱ्या उत्तरांचा विचार होणार नाहीं. उत्तर पुढील अंकांत प्रसिद्ध केलें जाईल.

**बुद्धिबळ क्र. २ चें उत्तर**

**आडवे शब्द—१ अकांडतांडव, ५ नाना, ६ कर, ८ कणव, १० गचका, १२ दरगा, १३ कसर, १५ तग, १९ कोप, २० फळफळावळ**

**उभे शब्द—२ कांबरूण, ३ तांडव, ४ वट, ५ नाटक, ७ रत्नाकर, ८ कवाईत, ९ वस्ताद, १० गदगा, ११ काटक, १४ सदाशिव, १६ गडप, १७ जिराफ १८ गोफ**

**विजेत्यांची नांवे पान १० वर पहा**

अनुक्रमणिका






[अनुक्रमणिका](#)








